[ ११ घटि ] या सुमुहूर्तावर आर्यौषधि कारखान्याचें एक नवीन अंग आयुर्वेद शाळा या संस्थेचा उद्घाटनसमारंभ मोठ्या थाटानें साजरा झाला. [तात्यांच्या कारकिर्दीतील या पहिल्याच ऐतिहासिक महत्त्वाच्या ] समारंभास मुंबईहून डॉ. देशमुख, डॉ. खेर प्रभृति डॉक्टरमंडळी व ठळकठळक वैद्य, सोलापुरचे भिषग्विलासकर्ते डॉ. रानडे, बडोदा कॉलेजांतील संस्कृत भाषेचे प्रोफेसर आर्ते, एम्. ए., रा. रा. मुकुंद बाळकृष्ण गुर्जर, बी. ए., प्रभाकर पत्राचे एडिटर, तसेंच प्रसिद्ध वक्ते रा. रा. घमंडेबोवा, अशी ठिकठिकाणची बडी बडी मंडळी व याशिवाय पनवेल येथील वकील, व्यापारी, सुखवस्तु गृहस्थ व श्रीमंत ओझे अशी मंडळी कार्यसिद्धीस आली होती. ”

“सुमुहूर्तीं आयुर्वेदशाळेचा होमहवनादि स्थापनविधि व शाळेचे गुरुवर्य व्याकरणशास्त्र, वैद्यकशास्त्र व धर्मशास्त्र–अधीत सुस्वभावी, विनयसंपन्न, पापभीरु असे वेदशास्त्रसंपन्न कृष्णशास्त्री नवरे यांचें पूजन, हा प्रकार ११ वाजेपर्यंत झाला. १२ वाजतां भोजनोत्तर-साडेपांच वाजेपर्यंत कारखाना पाहण्याची वेळ होती. साडेपांच वाजतां भव्य सुशोभित उच्च मंडपांत सर्व लोक हजर झाले. सभेच्या कार्यारंभीं आर्यौषधि कारखान्याचे मालक वे. शा. सं. कृष्णशास्त्री पुराणिक यांच्या तिसऱ्या व चौथ्या चिरंजीवांनीं स्वागतपर पद्य सुस्वर म्हटलें तें:—

चाल—भूपती खरे०

आनंद वाटतो आज आम्हांला साचा ॥
कीं तातहेतु हो पूर्ण बहुत दिवसांचा ॥
हें श्रेष्ठ बंधुचें हृद्गत ये उदयाला ॥
अति कौतुक वाटे जोड नसे जगीं याला ॥
मोडोनि अमोलिक वेळ तुम्हीं कार्याचा ॥
आलांत वाटतो भार आम्हांला साचा ॥

चाल–राहतां राजधानींत तुम्हीं सदां ।
ठाउकी तुम्हांला नाहीं आपदा ॥
आम्हि, ग्राम्य विनयता येथें संपदा ।
चाल– सर्वांस जाहला किति तरि श्रम येण्याचा ।
मागणें क्षमा हा हेतु खरोखर मनिंचा ॥

नंतर आर्यौषधि कारखान्याचे मालक वे. शा. सं. कृष्णशास्त्री पुराणिक यांनीं आभारप्रदर्शक भाषणांत फार दिवसांचा हेतु पूर्ण झाल्याबद्दल अत्यानंद दर्शविला. व मग प्रस्तुतचा उत्सर्ग व दान यांतील भेद सांगितला:—" एखादा तळें बांधतो व त्याचा उत्सर्ग करतो याचा अर्थ त्यानें त्या तळ्याचें पाणी पिऊं नये, असा नाहीं. गाय दान दिली तर तिचें दूध घेण्यास आपणास हक्क नसतो. उत्सर्गानें उत्सृष्ट वस्तूचा उपयोग करण्याचा उत्सर्गकारांस इतरांबरोबर हक्क आहे." सभेचें काम व्यवस्थित चालावें म्हणून शास्त्रीबोवांचे विनंतीवरून डॉ. देशमुख अध्यक्षस्थानीं विराजमान झाले. नंतर डॉ. रानडे यांनीं आरंभापासून आजपर्यंतचा आर्यवैद्यकाचा अति महत्त्वाचा इतिहास, व सभेचा हेतु सांगितला. नंतर रा. आत्माराम हरि खेर, बी. ए. यांनीं थोडक्यांत पनवेल येथील आर्यौषधि कारखान्याची लिहिलेली माहिती वाचली व शास्त्रीबोवांचे द्वितीय चिरंजीव रा. गदाधर कृष्ण पुराणिक यांनीं शाळेचे नियम व व्यवस्था वाचली. नंतर पनवेलचे करंदीकर वकील, सुप्रसिद्ध वक्ते घमंडे, डॉ. गोविंदराव खेर, वे. शा. दिनकरशास्त्री तारळेकर, वासुदेवशास्त्री ऐनापुरे व शंकर दाजी शास्त्री पदे यांचीं भाषणें झालीं. शेवटीं अध्यक्षांचें फारच मुद्देसूद भाषण झालें. ते म्हणाले " आयुर्वेदपारंगत वैद्य हे जर इंग्रजी वैद्यकांतील इंद्रियविज्ञान शास्त्राचा अभ्यास करतील व शारीरिकांत तयार होतील व वैद्यकांतील नवीन शोधांची माहिती वरचेवर करून घेतील, तरच,

राजाश्रयानें तयार झालेल्या डॉक्टरांपेक्षां लोकाश्रयास अधिक पात्र होतील." नंतर शास्त्रीबोवांनीं सर्वांचे आभार मानले व गुलाब पानसुपारी होऊन सभा विसर्जन झाली."

या समारंभाचे सूत्रधार विष्णुतात्या हेच होते. पण या समारंभांत त्यांनीं आपल्याकडे कोणतीच भूमिका घेतली नाहीं. सभेंत एक अवाक्षरहि काढलें नाहीं. त्यांचे वडील व कनिष्ठ बंधु यांसच प्रमुखत्वानें भाग घेऊं दिला, ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. यांत तात्यांची कार्यदृष्टि व निरभिमानवृत्ति या दोहोंचें उत्कृष्ट दिग्दर्शन होतें.

**अभिमानकृतं कर्म नैतत्फलवदुच्यते ।**
**त्यागयुक्तं महाराज सर्वमेव महाफलम् ॥** म. भा. १२।१२।१६

[ मी कर्ता अशा अभिमानानें केलेलें कर्म सफल झालें असें म्हणतां येत नाहीं. त्यागबुद्धीनें केलेल्या प्रत्येक कर्माचें फार मोठें फळ मिळतें. ]





# प्रकरण १३ वें.



## महाराष्ट्रभाषाचित्रमयूर यांचें एक शब्दचित्र.



ॐ यो देवोऽग्नौ योऽप्सु यो विश्वं भुवनमाविवेश ।
य ओषधीषु यो वनस्पतिषु तस्मै देवाय नमो नमः ॥१॥

श्वेताश्वतर

[ जो देव अग्नीमध्यें आहे, जो उदकामध्यें आहे. ज्यानें सर्व भुवनामध्यें प्रवेश केलेला आहे, जो ओषधींमध्यें आहे, जो वनस्पतीं-मध्यें आहे, त्या देवाला नमस्कार असो. ]

आर्यौषधि कारखाना हा श्रीधूतपापेश्वराचा अशी भावना कर-णाऱ्या रसाचार्यांचें एक उत्कृष्ट हृद्गत वरील मंगलांत प्रकाशित होतें.

मागील प्रकरणांत वर्णिल्याप्रमाणें कृष्णशास्त्री व विष्णुशास्त्री पुराणिक या पितापुत्रांनीं जें एक लोकोपयोगी कार्य नांवारूपास आणलें त्याचें महत्त्व किती होतें, तें मींच येथें अधिक विस्तारानें न सांगतां तत्कालीन एका सुप्रसिद्ध मासिकांतील विस्तृत उतारा देऊन तें कार्य परभारें भागविणें जास्त उचित होईल.

इ. स. १८९९ सालच्या केरळ कोकिळच्या अंकांत पुढीलप्रमाणें एक चिंतनीय लेख संपादकांनीं लिहिला आहे.

"पनवेल येथील आर्यौषधींचा कारखाना.

**भ्रांता वेदांतिनः किं पठथ शठतयाद्यापि चाद्वैतविद्यां**
**पृथ्वीतत्वे लुठंतो विमृशथ सततं कर्कशास्तार्किकाः किं ।**
**वेदैर्नानागमैः किं ग्लपयथ हृदयं श्रोत्रियाः श्रोत्रशूलैः**
**वैद्यं सर्वानवद्यं विचिनुत शरणं प्राणसंप्रीणनायः ॥ १ ॥***

"वरील श्लोकांत अलंकाराच्या पूर्ततेसाठीं इतर शास्त्रांना गौणता येत असली तरी त्यांत वैद्यशास्त्राची उपयुक्तता आणि वैद्याचें महत्त्व उत्तम प्रकारें ध्वनित केलें आहे ह्यांत शंका नाहीं. कोणताहि काल व स्थिति अशी नाहीं कीं जींत औषधाची व वैद्यांची गरज नाहीं. राजा स्वदेशी असो कीं परदेशी असो, वय लहान असो कीं मोठें असो, जातीनें स्त्री असो कीं पुरुष असो, वैद्य व औषध हीं पाहिजेतच."

"प्राचीन काळीं कोणत्याहि विद्येचा अभ्यास करणें फार कठीण पडे. आतांप्रमाणें कॉलेजें व स्कालरशिपा नव्हत्या, त्यावेळीं गुरुगृहवास पतकरून जन्माचा जन्म घालवावा लागे. भिक्षावृत्ति पत्करून निर्वाह करावा, आणि गुरूची सेवा करीत रहावें म्हणजे कालान्तरानें प्रसन्नता झाली तर झाली. गुरुगृहवास किती कठीण असतो, ह्याची कल्पना पाहिजे असेल तर आदिपर्वांतील उपमन्यूच्या कथेकडे लक्ष पुरवावें म्हणजे झालें. तसेंच त्या काळीं मुद्रणकलेची वगैरे सोय नव्हती. ह्यामुळें बहुतेक जन्म पाठांतरांतच घालवावा लागे. एक एक ग्रंथाची प्रत मिळविणें म्हणजे एक एक वाडा बांधणें, किंवा इनाम जमीन संपादन करणें इतकें कठीण होतें. शंभर शंभर पुतळ्या किंवा मोह-

*बुद्धिभ्रमण पावलेल्या वेदांत्यांनों, अप्रामाणिकपणानें अद्यापि अद्वैत वेदांतशास्त्राचें पठन काय करतां ? रूक्षबुद्धीच्या नैय्यायिकांनों भूमींत मिळून जाण्याची पाळी आली असतां अद्यापि सारखा विचार कसला करतां ? श्रोत्रिय ब्राह्मणांनों कर्णकटु अशा वेद व नानाशास्त्रें यांच्या पठणानें हृदयाला कां भागवितां ? प्राणसंजीवनार्थ (रोगां-पासून) रक्षण करणारा निष्पाप वैद्य शोधून काढा.

राही एक एका ग्रंथाबद्दल याव्या लागत. कोठें कोठें शंभर गाई, शंभर बैलहि दिल्याचे दाखले आढळतात. असो. चरकापासून पुढें सर्व वैद्य-काचें सार म्हणून थोडक्यांत काढूं लागले, जसें वाग्भट. परंतु त्यासमयीं सुद्धां ग्रंथ तोंडपाठ करण्याची चाल होती. ग्रंथ सूत्ररूपानें असला म्हणजे पाठ करण्यास सुलभ, व ग्रंथाचाहि विस्तार नाहीं. म्हणून जें काय लिहिणें तें सूत्ररूपानें लिहिण्याची चाल होती. त्यामुळें त्यांत कठीणपणा राहून गुरुमुखाशिवाय त्याचा उलगडा होत नसे. पुढें पुढें ही विद्यासुद्धां अस्तास जाण्याचा समय आला होता. कारण पुढें लौकरच ह्या देशाचें नष्टचर्य ओढवलें, आणि महंमदासारख्या मुसलमानांची टोळधाड ह्या आर्य-भूमीवर पडून सारी धुमाकूळ माजली. मग प्राचीन विद्येकडे पहाणार कोण ? एका हातांत कुराण, व एका हातांत तरवार, असा प्रसंग येऊन वेतल्यामुळें तर, प्राण वांचवितां वांचवितांच पुरें झालें. पण तसल्या बिकट प्रसंगांतूनहि आमच्या प्राचीन विद्या इतपत राहिल्या ही सुद्धां कांहीं कमी नशीबाची गोष्ट नाहीं. परंतु संकटावस्थेंतहि कांहींना कांहीं आश्रय मिळतो असा ईश्वरी नियम आहे. महापुरांत वहात असलेल्या-मनुष्यास एखादें लांकूड तरी सांपडतें. अफाट दर्यांत गटंकळ्या खात असलेल्या मनुष्यास एखादें बेट तरी लागतें त्याप्रमाणें यवन समुद्रांतहि आमच्या आर्य लोकांस अकबर बादशहा हें सुखाचें बेट सांपडलें. तेथें बरेंच विश्रांतिसुख भोगावयास मिळालें. तो जसा अरबी भाषेचा अभिमानी होता, तसाच संस्कृत भाषेचाहि होता. त्याचें स्वज्ञाति-बांधवांवर जसें प्रेम असे, तसेंच इतर कोणत्याहि जातीवर असे. त्यामुळें संस्कृत विद्यांना पुनर्जीवन प्राप्त झालें. द्राक्षें, खजूर, खारका, इत्यादि परदेशांतील जिन्नस आम्हांस माहित होते खरे, पण त्यांपासून होणाऱ्या औषधांची माहिती नव्हती. ती होऊन इसबगोल, गुलाबकळी,

खुरसानी ओवा इत्यादि जास्त औषधांची आमच्या वैद्यकांत भर पडली. ”

“पुढें लौकरच श्रीशिवाजी महाराजांचा उदय झाला, त्यामुळें, महाराष्ट्रांतील प्रत्येक कुटुंबास उर्जितावस्था प्राप्त झाली. तरी पण राष्ट्राची शांतता पूर्ण अंशावर चढली नव्हती, म्हणून स्वतंत्र वैद्यक शाळा अशा कोठेंच नव्हत्या म्हणण्यास हरकत नाहीं. प्रत्येक श्रीमंतांच्या पदरीं नामांकित वैद्य मात्र असे. व त्याच्या जवळ १।२ शिष्यहि असत. शेवटच्या बाजीरावापाशीं, वामनराव ह्या नांवाचे कोणी प्रख्यात वैद्य होते. पुढें पेशवाईचा अंत झाला, त्यावेळीं ब्राह्मणांच्या सालोसालच्या दक्षिणा एलफिन्स्टन साहेबांनीं दयाळू होऊन कायम ठेवल्या. पुढें दक्षिणेची परीक्षा बंद करून पाठशाळेची स्थापना झाली. तींत गुणांशानें प्रत्येक विद्यार्थ्यास पांच रुपयांपासून सात रुपयांपर्यंत स्कॉलरशिप मिळत असे. वेदाकडे व शास्त्राकडे मिळून एकंदर १५०० रुपये दरमहा खर्च होत असत. ह्यावेळीं एकंदर दहा शाळा होत्या. त्यापैकीं ऋग्वेद, यजुर्वेद, आपस्तंभ व वेदांत, ह्या चार विषयांच्या शाळा बंद करण्यांत आल्या. शास्त्रांच्या शाळा विश्रामबागेंत असत. त्या सहा मात्र शिल्लक राहिल्या. त्यांतः—

| | | | |
|---|---|---|---|
| व्याकरणाचे विद्यार्थी | २० | अलंकार | १६ |
| वैद्यक | १६ | धर्मशास्त्र | १६ |
| न्याय | १६ | ज्योतिषशास्त्र | १६ |
| | ५२ | | ४८ |

“ ह्याप्रमाणें पगारी विद्यार्थी शंभर व फीशिवायहि अनेक विद्यार्थी घेतले जात. पुढें कांहीं मुदतीनें विद्यार्थ्यांचे पगार कमी ( ३॥ पासून ५ पर्यंत ) करण्यांत आले. पुढें पाहिजे त्या जातीच्या विद्यार्थ्याला

शिकविलें पाहिजे असा नियम झाला; व अखेरीस डेक्कन कॉलेजाची स्थापना होऊन पाठशाळा ह्यांतच अंतर्भूत होऊन प्राचीन शास्त्रें आश्रयरहित पडलीं."

"ह्याकाळीं पुण्यामध्यें पाठशाळेशिवाय इतर रीतीनें गुरूजवळ अध्ययन करून प्रत्येक विद्येमध्यें अनेक लोक तयार झाले, व त्यांनीं आपआपल्या कामांत उत्तम लौकिक संपादन केला. प्रसिद्ध भिषग्वर्य बापूसाहेब मेंहदळे, बंडूनाना रानडे, वगैरे विद्वद्रत्नें तयार झालीं तीं याच कालांत. ह्यांच्यापैकीं कोणीहि पाठशाळेंत शिकलेला नव्हता. अशा प्रकारचे वैद्य तयार झाले खरे. पण औषधिगुणांत वगैरे नवीन शोध किंवा सुधारणा कांहींच झाली नाहीं. कारण, औषधी तयार करण्याची सर्व खटपट प्रत्येक वैद्यालाच करावी लागे. त्यामुळें एकावरच सर्व भार पडे. आणि त्यांपैकीं थोड्यांसच जय येई. म्हणजे विद्वानांनीं परिश्रम करून साध्य केलेली विद्या एक, आणि उदरंभरणाची व्यवस्था सारी दुसऱ्याच विद्येवर असा प्रकार झाला."

" वे. शा. सं. श्रीधरशास्त्री पाटणकर ह्यांनीं वैद्यशास्त्र व अलंकारशास्त्र पढून, या विद्येव्यतिरिक्त अन्य विद्यांच्या शिक्षणावर आपला निर्वाह केला, व आतां पेन्शनाचा उपभोग घेत आहेत. काशिनाथ उर्फ तात्याशास्त्री थोरात पाठशाळेंत वैद्यक पढून पनवेलीस मराठी शाळेवर हेडमास्तर झाले. तेथें त्यांस वीस रुपये पगार मिळून शिवाय वैद्यक्रियेवर त्यांनीं चांगलाच लौकिक संपादन केला. तसेंच वे. शा. सं. सखारामशास्त्री नावलेकर हल्लीं वस्ती पनवेल, नृसिंहशास्त्री शेज्वलकर हल्लीं वस्ती पुणें ( हे गृहस्थ तेथें असणाऱ्या 'वेदशास्त्रोत्तेजक शाळेंतील व्याकरणशास्त्राचे परीक्षक असतात ) ह्या उभयतांनीं व्याकरणशास्त्राचें अध्ययन करून वैद्यकीवर निर्वाह चालविला आहे ? ह्या प्रकारें बुद्धि, श्रम, व उदरनिर्वाहाचें साधन,

हीं एका रेषेंत न आल्यामुळें, त्यांची व्हावी तशी चीज झाली नाहीं. आतां विद्वान् म्हणून त्यांचा लौकिक होणें साहजिकच आहे. पण वर सांगितलेली त्रयी नीट जुळती, तर ह्याहून किती तरी पट अधिक लौकिक झाला असता. ”

“प्रस्तुतचे आमचे राज्यकर्ते परकी आहेत. तरी त्यांनीं ह्या आमच्या परक्या देशांत जीं परोपकाराचीं व औदार्याचीं कृत्यें केलीं आहेत, त्यांत औषधांची व इंग्रजी वैद्यांची सुलभता हें एक महत्कृत्य होय. शहरांतलि गल्लोगल्लींनीं शिकलेले एल्. एम्. अण्ड् एस्. डॉक्टर, व खेड्यापाड्यांतून गोरगरीबांस सुद्धां मोफत औषध; असें करून टाकलें आहे, मग तें कितीहि मौलवान असो. अशी सोय पूर्वींच्या कोणत्याहि राजाच्या कारकीर्दींत असल्याचें आढळून येत नाहीं. ”

“ असें आहे तरी ह्या नव्या थाटमाटास भुलून आमच्या देशांत उत्पन्न होणाऱ्या दिव्यौषधींचा व प्राचीन आर्यवैद्यकाचा आम्हीं सत्यानाश करतां कामा नये, ही गोष्ट पूर्णपणें लक्ष्यांत वागविली पाहिजे. पाश्चात्य देशांतून येणाऱ्या सुंदर सुंदर आकाराच्या बाटल्या; त्यांचीं तीं गुलजार आणि चित्रविचित्र बुचें; रंगीबेरंगी अक्षरें व चिठ्ठ्या; त्यांचीं तीं सुबक बिंदु–मापनाचीं व द्रव–मापनाचीं काचपात्रें; त्यांचीं तीं पांढरीं शुभ्र व लोण्यासारखीं सत्वें; हीं पाहून आपल्या त्या सराट्यांचा व रिंगणी–मुळांचा अगदीं तिटकारा येतो. त्यांच्या त्या झळझळीत मद्यार्कापुढें आमचा काढानिकाढा केवळ शेणखळ्यासारखा भासूं लागतो. व त्याप्रमाणें आमची पूर्वापार चालत आलेलीं औषधें नवी करावयाचीं एका बाजूस ठेवून करण्याच्या व घेण्याच्या पद्धतिसुद्धां विसरत चाललों आहोंत. ही निखालस चुकी आहे. ज्ञानेश्वर महाराजांनीं म्हटलें आहे:—

" तरी लोकांचीं धवळारें । देखोनिया मनोहरें ।
असती आपुलीं तृणारें । मोडावी केवीं ॥ "

लोकांचे मनोहर चुनेगच्ची वाडे पाहून आपल्या असलेल्या गवताच्या झोंपड्या का उसकटून टाकावयाच्या ? हाच न्याय येथें लागू आहे. प्रोफेसर सिली म्हणतातः—"आपण विद्यमान गोष्टी सुस्थितीस आणाव्या. परंतु त्यांचा नाश करूं नये." वरील उक्ति आमच्या साधूची आहे, आणि खालची उक्ति पाश्चात्य विद्वानाची आहे. मिळून दोन्हीहि आमच्या हृत्पटलावर खोदून ठेविण्यासारख्या आहेत. त्याच प्रकारचे उद्गार पुण्यास गायन समाजोत्सवाचे वेळीं गव्हर्नर साहेबांचे निघाले होते. प्रस्तुत आम्ही फार आळशी आणि परावलंबी झालों आहोंत. प्रत्येक वस्तु परदेशांतून आलेली घेण्याची आम्हांस संवय लागली आहे. आम्हांस यःकश्चित् साधें घरांत मिळण्यासारखें औषध असलें, तरी सुद्धां तें बाजारांतील बाटलींतलें आयतें घेण्याची संवय लागली आहे. उदाहरणार्थ, एरंडेल तेलच घ्याना, हें आम्हांला आमच्या मुलाबाळांनां, रेचक घेण्यासाठीं आठचार दिवसांनीं बहुधा लागतेंच. आतां खरें पाहिलें असतां एरंड्यांचा आमचे हिकडे सवंग सुकाळ आहे. येवढेंच नव्हे, पण त्या लाखोंखंडी आमच्या देशांतून परदेशांत जातात. आमच्या खेड्यांपाड्यांतून त्यांना दमडी सुद्धां पडावयाची नाहीं. त्यांचें तैल काढणें, म्हणजे मोठी यांत्रिक विद्या आहे, अशांतलाहि प्रकार नाहीं; पण आमचे लोक युरोपांतून लेबल लावून आलेल्या बाटलीला पांच आणे देतील ? त्याशिवाय त्यांस चैन पडावयाचें नाहीं. ही संवय चांगली नाहीं येवढेंच नव्हे तर मोठी अपायकारक आहे. पुढें मागें असें होईल कीं, एरंडेल हा शब्द अजिबात नाहींसा होऊन त्याच्याऐवजीं ' क्यास्टर आईल ' हा शब्द प्रचारांत येईल. आणि तो माल यूरोपांतून आला नाहीं तर तो पदार्थ

काय होता तें न समजून आमच्यांतलें एक औषध नाहींसें होऊन जाईल."

"ही प्रत्येक औषधाच्या म्हणा अगर जिनसाच्या म्हणा, बाबतींत दुसऱ्याच्या तोंडानें पाणी पिण्याची संवय इष्ट नाहीं. आजरोजीं आठवड्याच्या आठवड्याला आम्हांस डांक येऊन पोंचल्यामुळें यूरोपखंड जरी परसांतली भाजी होऊन राहिलें आहे, तरी तें सातां-समुद्रांपलीकडे आहे ही गोष्ट विसरतां कामा नये. आईमध्यें आणि दाईमध्यें किंवा आपली कुलस्त्री आणि पण्यांगना यांमध्यें जितकें अंतर, तितकेंच स्वकीय आणि परकीय ह्यांचेमध्यें अंतर आहे. दाईनें किती ममता केली तरी तिला आईपण यावयाचें नाहीं; तसें परकीयांनीं आम्हांविषयीं कितीहि कळकळ वाहिली तरी त्यांत आपलेपणा याव-याचा नाहीं व इतक्या लांबीचा परकीय लोकांचा व्यापार यावच्चंद्र-दिवाकरौ असाच चालेल, असेंहि खात्रीनें म्हणतां येणार नाहीं. कालवशात् हें दळणवळण बंद पडलें, किंवा उत्तरोत्तर स्वताई करून करून माल पाठविणें त्यांस अशक्य झालें, तर आमची दशा कुत्रा-सुद्धां खाणार नाहीं ? + + + "

"वरील त्रोटक प्रतिपादनावरून औषधादि द्रव्यें आपल्याच देशांत तयार होऊन त्यांचा उपयोग व्हावा ही गोष्ट अत्यंत इष्ट आहे हें सहजीं ध्यानीं येईल. आतां लापलंडासारखी वनस्पतिशून्य, धातु-शून्य भूमि, आमच्या कपाळीं आली असती, तर अशा प्रकारचा मार्ग अर्थातच खुंटला असता. परंतु परमेश्वरकृपेनें आम्हांस जी भूमि प्राप्त झाली आहे ती दिव्य औषधि, आणि दिव्य धातु यांचें भांडार आहे. म्हैसूर, अळणावर इत्यादि ठिकाणीं सोन्याच्या खाणी आहेत; कलकत्ता, मणिपूर येथें दगडी कोळशाच्या खाणा आहेत; सिलोन-मध्यें शिसपेन्सिलीच्या शिशाच्या खाणी आहेत. कोयनेल तयार

करणारी दिव्यौषधि सिंकोना निलगिरीस भरली आहे. सार्सापरिलाचें गवत मलबारांत भरलें आहे. 'टिंकचर बेली' हें औषध ह्या देशांतून बेलफळें नेऊन तें युरोपांत तयार करून आणितात! हगवणीवर ताज्या बेलफळाच्या बलकानें जसा गुण येतो, तसा त्या शिळ्या अर्कानें येत नाहीं. पण असलीं साधीं औषधें सुद्धां आमच्या हयगयीनें लुप्त होत चाललीं. वात विकारावर रामबाण गुण आणणारें 'लेमनग्रास आईल' ज्या गवता ( गवतीचहा ) पासून निघतें, त्या गवताचीं जंगलेंच्या जंगलें सिलोनांत फैलावलीं आहेत. 'स्ट्रिक्रिया' औषध मलबारांत शेंकडों खंड्या उत्पन्न होणाऱ्या काजऱ्याच्या बियांपासून होतें. कोणतीहि वनस्पती, धातु किंवा प्राणी, आमच्या देशांत नाहीं असें बहुधा नाहीं. असें असतां आम्हांस प्रत्यहीं लागणारीं औषधें आमच्याच देशांत तयार होऊं नयेत काय ?"

"पण हल्लींची स्थिति पहा! दक्षिण समुद्राजवळ वनस्पती काढावयाच्या. त्या कुटावयाला व साफ करावयाला उत्तर समुद्राजवळ न्यावयाच्या; आणि त्या पोटांत घ्यावयाला पुन्हां दक्षिण समुद्रापाशीं आणावयाच्या. कोण हा द्राविडी प्राणायाम? त्यापेक्षां येथील वनस्पतींचीं औषधें येथेंच तयार व्हावयाचीं नाहींत काय? होतील. राजाश्रय पाहिजे; किंवा लोकाश्रय तरी पाहिजे. पैकीं सार्वभौम सरकारानें 'यथाराजा तथा प्रजा,' ह्या न्यायानें, पाश्चात्य विद्येनें पंडित झालेल्या, पढिक डॉक्टरांचा व टिंक्चरें, पावडर्स व आसिडें ह्यांचा सवंग सुकाळ करून टाकल्यामुळें. जुन्या वैद्यांस व हिरडा-बेहेडा-आवळकाठीस किंवा मात्रा, भस्में, गुटिकांस तरी विचारणार कोण? तशांत दारिद्र्यावस्था आमच्या हाडींमांसीं खिळलेली, बहुतेक वैद्य केवळ पोटार्थी. हातानें नाडी दाबून धरावी, व कफ-वात-पित्त त्रयींपैकीं कोणचें तरी अधिकच सांगावें, कशाची तरी गोळी किंवा मुळी द्यावी, म्हणजे



वनदेवतांनीं आणलेल्या वनस्पति.

[ पृ. १३८

आटोपला कारभार. हास्पितळांतलें मुक्तद्वारचें औषध टाकून ह्या बिचाऱ्याला तरी अधिक पैसे देणार कोण ? तेव्हां अर्थातच ' देणावळ तशी धुणावळ ' अशांतला प्रकार होतो. ह्याहूनही अश्विनी कुमार बनावयाचें असेल तर जाहिरातीचा भडिमार ! वचनाला कांहीं दरिद्रता नाहीं. 'तासांत गुण,' 'पैसे परत,' ' रामबाण ' 'धन्वंतरी,' असें होतां होतां अखेर ' मृत्यु म्हणून कधीं यावयाचा नाहीं," ही प्रतिज्ञा कोणांकडून बाहेर पडते, त्यांकडे डोळे लागून राहिले आहेत; असो."

"विलायतेस औषधासाठीं जाणारीं मूळ द्रव्यें बहुतेक ह्याच देशांतलीं, असें वर सांगण्यांत आलेंच आहे. शाळा व कॉलेजें ह्यांमध्यें औषधिक्रियेसंबंधानें प्रयोगशः पाहिजे तसें शिक्षण मुळींच देण्यांत येत नाहीं. आमच्यांतील कितीएक डॉक्टर लक्षाधीश आहेत, तरी त्यांच्या मनांत इंग्रजी अगर देशी औषधें तयार करण्याचा कारखाना घालावयाचें येत नाहीं. संपत्ति म्हणजे तरी काय! केवळ द्रव्यच असें म्हणतां येत नाहीं. उत्पन्न होणाऱ्या साधनांची विपुलता तीच संपत्ति होय, असें म्हटलें तर शोभण्यासारखें आहे. जसें:—शेतकऱ्याचे नांगर, बैल, इत्यादि, व्यापाऱ्यांचा अनेक प्रकारचा माल, त्याचप्रमाणें वैद्य व डॉक्टर यांचीं औषधें हीच संपत्ति होय. असें असतां सुतार, लोहार, तांबट, दुकानदार, पेढीवाले, इत्यादि तमाम लोक जमिनीची इच्छा करितात. ह्यामुळें त्यांच्या त्यांच्या धंद्यांत दुर्लक्ष्य होऊन शेतकरी वर्गास मात्र विनाकारण अडचण झाली आहे व होतहि आहे."

"हल्लींची आर्यवैद्यकाची स्थिति केवळ बुडत्या मार्गांत आहे. वैद्यशास्त्राची वेसहि ज्यांनीं पाहिली नाहीं, तेच धन्वंतरी बनून पुढें येतात. शिकलेले लोक पोटापुरता उद्योग पहातात. ' मग, मला आतां काय करावयाचें आहे! हा मन्त्रे !' ह्यामुळें देशाचें फार नुक-

सान झालें आहे. गुरूचा शिष्यावर विश्वास नाहीं ही स्थिति ! एक दोन जडीबुट्या पदरीं पडल्या न पडल्या तोंच शिष्य वैद्यराज बनतात. यामुळें विद्या बुडाली व औषधीक्रिया अशिक्षितांच्या हातीं जात चालली. आणि पारा लसणीच्या रसांत एकप्रहर खलला कीं, शुद्ध होतो, असे ग्रंथाधार निघाले. मग काय ! अशा ग्रंथाला ऊत येऊं लागला. वैद्यकावर सशास्त्र ग्रंथ तर २०० वर्षांत तयार झालेला नाहीं. सुलभ ग्रंथ झाले पाहिजेत; अनुभव कळले पाहिजेत; वनस्पति, शारीर, रसायनकृति इत्यादि विषयांचें परिशीलन वाढलें पाहिजे. सारांश, पूर्वींच्या कालाच्या मानानें त्या वेळेस आपलें वैद्यक पूर्ण दशेस आलें होतें. आणि तें आजच्या स्थितीला कितीतरी पटीनें अधिक सुधारावयास पाहिजे होतें. कारण जग नेहेमीं सुधारत असतें. आणि त्यांत वैद्यशास्त्र हें तर नेहेमीं सुधारत्या पंथावरच राहणार. पण आज-मितीला जें वैद्यशास्त्र अवगत आहे, तें पूर्वींच्या स्थितीच्या सरासरी निम्या प्रमाणानेंही नाहीं. इतर राष्ट्रांकडे पाहिलें तर तीं ह्या काळांत फार पुढें गेलीं आहेत. म्हणून एक ठिकाणींच सर्व कामें व्हावींत अशी कोठें तरी सोय होणें अवश्य आहे."

"तात्पर्य काय कीं, राजाश्रयाचा अभाव झाल्यामुळें आमचें प्राचीन वैद्यक व दिव्यौषधि उदयास येणें मोठ्या भगीरथ प्रयत्नाचें काम होऊन राहिलें आहे. आधीं यथाशास्त्र वैद्यकी शिकणें व त्याचा अनुभव घेत बसणें हें कांहीं कमी प्रयासाचें काम नाहीं. त्यांत वनस्पति, धातु, त्यांचें शोधन मारण करणें व तैलें, भस्में, चूर्णें तयार करणें, भट्ट्या लावणें, ह्यांचा समावेश केला म्हणजे कसलाही उद्योगी पुरुष असला तरी त्याची छाती दडपून जाईल, ह्यांत शंका नाहीं. चिता-ऱ्यानें आपल्याच हातानें रंग घोटणें व कलमें बांधणें, लेखकानें आप-णच शाई करणें, व लेखण्या तयार करणें, ह्याहूनही वैद्यानें औषधें

तयार करणें ही जिकीर व यातायात फार मोठी आहे. कारण औषधें हीं अनंत आहेत. पण कितीएक दीर्घोद्योगी व दृढनिश्चयी महात्मे असे असतात कीं, शेंकडों अडचणी केवळ स्वपराक्रमानें दूर सारून भगीरथ प्रयत्नानें रसातळास गेलेल्या शास्त्ररत्नांचा उद्धार करतातच करतात. अशा दीर्घोद्योगी व सद्धेतुसाधक मंडळीपैकींच वे. शा. सं. कृष्णशास्त्री पुराणिक वैद्य व रा. रा. विष्णु कृष्ण पुराणिक, कारखान्याचे चालक, ही पितापुत्रांची जोडी आहे."

"आमच्या लोकांत कर्तबगारी नाहीं; हिंमत नाहीं; शिस्त नाहीं; नवी युरोपिअन लोकांसारखी टापटीप नाहीं; दूरदर्शित्व नाहीं; नवीन कल्पना काढण्याचें सामर्थ्य नाहीं; असें ज्यांचें मत असेल त्यांनीं वर सांगितलेल्या गृहस्थांनीं, पनवेल येथें स्थापन केलेला 'आर्यौषधींचा कारखाना' अवश्य जाऊन पहावा. म्हणजे त्यांच्या मनाचें परिपूर्ण समाधान होईल. येवढेंच नव्हे पण प्राचीन वैद्यशास्त्राविषयीं व जुन्या पद्धतीच्या वैद्याविषयीं पूज्यबुद्धि व आदर उत्पन्न होईल. तशी ज्यांना सवड होणार नाहीं, त्यांच्या मनांत त्याविषयीं थोडी तरी कल्पना व्हावी म्हणून त्याची थोडीशी हकीगत आज आम्हीं देत आहों."

" ह्या कारखान्याची जागा त्यांच्या घरानजीकच असून चांगली प्रशस्त आहे. राहत्या घराच्या पूर्वेकडील इमारत एकमजली असून तींत मुख्य वैद्यांची बैठक व औषध देण्याचें स्थळ आहे. शास्त्रीबुवा वयानें पोक्त असून विद्वान्, तरतरीत, नम्र व बोलण्यांत चतुर असे दिसतात. कितीहि रोगी आले तरी त्यांचें यथोचित् आदरातिथ्य करणें, त्यांची मनापासून चिकित्सा करणें, त्यांचीं लक्षणें ऐकून घेणें, त्यांवर यथाशास्त्र औषधयोजना करणें, इत्यादि कामांत आस्थापूर्वक गुंतून राहिल्याचें दिसून येतें. जुन्या वैद्यांवर असा

एक आरोप आहे कीं, ते आपला धंदा गुप्त ठेवितात. म्हणजे रोग कोणता, कशापासून झाला हेंहि सांगत नाहींत व त्यावर कसल्या औषधाची योजना केली तेंहि कळवीत नाहींत. कसली तरी गोळी किंवा पूड, किंवा भस्म, देतात म्हणजे झालें. तसा छपवाछपवीचा प्रकार येथें बिलकूल नाहीं. येथें इंग्रजी दवाखान्याप्रमाणेंच रोग्याचें प्रिस्क्रिप्शन म्हणजे लेखी तक्ता तयार करतात, व त्यांत रोग, निदान, लक्षणें, औषध इत्यादिकांचें सविस्तर वर्णन असतें."

"आंतील बाजूस औषधें देणाऱ्यांच्या खोल्या आहेत. तेथें सुद्धां स्वच्छता, टापटीप अगदीं इंग्रजी दवाखान्याच्या धर्तीवर ठेवलेली असते. औषधांच्या कपाटांत आसवांच्या, अरिष्टांच्या बाटल्या, भस्माच्या व गोळ्यांच्या लहान लहान बाटल्या, नांवांच्या चिठ्ठ्या वगैरे लावून फार सुरेख ठेविल्या असतात. वजनाचे कांटे, खलबत्ते, चाकू कात्री वगैरे सामान अगदीं जेथल्या तेथें व अगदीं ठाकठिकीनें ठेवलेलें असतें. टेबला-प्रमाणेंच उंच ग्यालऱ्या करून त्यांवरून औषधें देण्यांत व ठेवण्यांत औषध देणारे सारखे गुंतून राहिलेले असतात. राहत्या घराच्या पश्चिम दिशेला कारखान्याची पृथक् व प्रशस्त जागा आहे, त्यांत उत्तरेच्या बाजूला औषधें तयार करण्याची दुसरी इमारत आहे. ही एक मज-ल्याचीच असून तींत नाना प्रकारच्या भट्या, यंत्रें, काटतेलें तयार करण्याचीं मोठमोठीं पातेलीं व हौद लावून ठेवलेलीं आहेत. थोड्या जळणांत अधिक उष्णता कशी उत्पन्न करावी हें ह्यांत फार चतुराईनें दाखविलें आहे. त्यांवरील निरनिराळीं पात्रें ठेवण्यास तजवीज व जळजळीत धातुरसाचीं पात्रें वगैरे उतरण्याची तजवीज, निरनिराळ्या प्रकारचीं नूतन केलेलीं गांवठी अग्निधारक औषधि यंत्रें, हीं पाहिलीं म्हणजे चालकांच्या यांत्रिक कुशलतेबद्दल कौतुक वाटल्यावांचून रहात नाहीं."



श्रीधूतपापेश्वर आर्यौषधि कारखान्यांतील भट्ट्या. [ आसवारिष्टें व तेलें यांच्या ] [ पृ. १४२

"पश्चिमेच्या बाजूला दोन मजली इमारत आहे. तेथें सर्व प्रकारच्या औषधींचा मोठा संग्रह, कागदपत्रांचें रेकार्ड-दप्तर व चालकांची ( शास्त्रीबोवांचे चिरंजीव रा. रा. विष्णु कृष्ण पुराणिक ह्यांची ) कचेरी असते. नवीन औषधें तयार करणें, वनस्पति वगैरे संग्रह करणें, पत्रव्यवहार व हिशेब ठेवणें इत्यादि सर्व कामांवर ह्यांची देखरेख असते. ह्या व्यवस्थेच्या कामांत हे गृहस्थ इतके दक्ष आहेत कीं, तसा सरकारी कामदारही असणें कठीण. कोणाचा दहा वर्षाच्या पूर्वीं झालेला जरी पत्रव्यवहार असला, तरी ते तो तत्काळ पुढें आणवितात, इतकी ह्यांची विल्हेवारी सुरेख व व्यवस्थेशीर आहे. वडिलांच्या व ह्यांच्या बैठकीच्या जागेंत अंतर असल्यामुळें साधारण सल्ला-मसलती नेहेमीं बहुतकरून माणसाच्या हातीं चिठ्ठ्या देऊनच चालतात."

"ह्यांचे पत्रोत्तर-ठरीव बाबी, रुग्णपत्रिका व रोजनिशी येवढे तीन छापील तक्ते पाहिले, तरी सुद्धां त्या पुरुषांच्या उद्योगशीलतेची धन्यता वाटल्यावांचून राहत नाहीं. 'पत्रोत्तर ठरीवबाबी' ह्या तक्त्यांत पत्रें पाठविणारांनीं पत्रें कशीं पाठवावींत तें सुचविलें आहे. नंतर औषधांचा टिकाऊपणा वगैरे बऱ्याच बाबी आहेत. पण त्यावरून व्याधिग्रस्तांस व गिऱ्हाइकांस पुष्कळच साह्य होण्यासारखें आहे. दुसरा तक्ता 'रुग्णपत्रिका' हा होय. ह्यांतील माहिती किती म्हणून सांगावी ? रोग्याचें नांव, गांव, काय होतें ? केव्हांपासून, कारण कांहीं माहिती आहे काय, पूर्वीं औषधोपचार काय केले, इत्यादि पहिले प्रश्न. नंतर प्रत्यहीं कोष्टकांत भरण्याच्या बाबी, चालू उपचार, आरोग्यसूचक लक्षणें, झोंप गाढ, स्वप्न, रोग्याचें वजन-शेर, अंगांतील उष्णतेचे अंश इत्यादि खेड्यापाड्यांतील लोकांसहीं आपल्या प्रकृतीचें मान बरोबर कळवितां यावें म्हणून विकारांचे व आरोग्याचे परमावधीचे शंभर अंश कल्पून त्याप्रमाणें

विकार व आरोग्यता रोग्यानें कळवावी. ही युक्ति किती तरी महत्त्वाची होय हें विचाराअंतीं वाटल्यावांचून राहात नाहीं. ह्याशिवाय प्रत्येक बाबीवर खुलासेवार टिपा आहेत त्या वेगळ्याच. तिसरा तक्ता रोजनिशी. ही फारच पाहण्यासारखी—नव्हे तारीफ करण्यासारखी आहे. हिच्यांत जमाखर्चाचा सर्व तपशील, हजर नोकर संख्या—लोहार, सुतार, कारकून वगैरे तपशीलासह—औषधें तयार होत असलेल्यांचीं नांवें, भट्ट्यांची हजेरी- गजपुट, वालुकायंत्र, बाष्पयंत्र, अग्निशिशी इत्यादि, नवीन औषधें अनुभवाकरितां तयार झालीं तीं, नवीन औषधांची जरूरी, औषधांसंबंधीं अनुभव कळविणाराचें नांव, नवी युक्ति काढण्याविषयीं प्रयत्न—तपशील—कारखाना पाहाण्यास आलेल्या लोकांचीं नांवें व पत्ता, बाहेरगांवांहून आलेले रोगी व पाहुणे, पत्रव्यवहार, शाळेचा शिक्षणक्रम, विद्यार्थ्यांची हजेरी वगैरे तपशील, औषधांची लागवड व अनुभव, कारखान्यासंबंधीं लोकमत; चालकांच्या वेळाची खासगी डायरी, हींत सकाळीं सहापासून तों रात्रीं सुद्धां दोन तासांचीं कोष्टकें आहेत. इतकीं कोष्टकें प्रत्यहीं जो बिनचूक रीतीनें भरून फायलांस ठेवतो, त्या पुरुषाची पाठ किती थोपटावी हें कांहीं समजत नांहीं. इतकीं सर्व नित्यांचीं कामें सांभाळून वनस्पतीची नवी लागवड करून त्यांचा अनुभव पहाणें, नवीन कल्पना काढणें म्हणजे कांहीं सामान्य उद्योग नव्हे. अशा भगीरथ प्रयत्नाशिवाय आमच्या जीर्ण कलांचा उद्धार व्हावयाचा नाहीं. चालकांच्या इमारतींतील औषधांचा संग्रह पाहूनही जीव चकित होऊन जातो. एका बाजूला मुरंब्याच्या व पाकांच्या मोठमोठाल्या बरण्या ठेंचून लागल्या आहेत; एका बाजूला अरिष्टांच्या व आसवांच्या बरण्यांच्या ओळी; एका बाजूला भस्मांच्या व चूर्णांच्या कुप्या; एका बाजूला कडू पडवळांची

रास; एका बाजूला वावडिंगांची रास; एका बाजूला कुड्याचीं पाळें; एकीकडे पळसाचीं फुलें पडलीं आहेत, तर एका बाजूला कुवारकांड, एका बाजूला नागरमोथे, तर एका बाजूला काढेचिराईत; एका बाजूला रित्या बाटल्यांचा ढीग, तर दुसऱ्या बाजूला बुचांचे गठ्ठे असे एक कीं दोन? काय काय म्हणून सांगावें? प्रत्यक्ष अश्विनी-कुमार तेथें आले तर ते सुद्धां प्रसन्न होतील; मग आम्ही खुष झालों ह्यांत नवल तें काय?"

"'औषधें घेण्याची रीति' म्हणून त्यांनीं एक स्वतंत्रच दोन आणे किंमतीचें पुस्तक छापलें आहे. त्यावरून त्यांच्या कारखान्यांत शास्त्रोक्त रीतीनें तयार केलेलीं २४ भस्में; ५२ रसायनें; ८ कुपिस्थ रसायनें; २७ गुग्गुलगुटिका; १७ चूर्णें; ९ पाक; १८ आसवें; १९ सत्वें व क्षार; ११ तैलें व मलमें; ४ अर्क; व ५० तऱ्हांचीं अनुभविक औषधें तयार आहेत असें समजतें. म्हणजे एकंदर संख्या अडीचशें सुमार झाली. ह्यांशिवाय पाहिजे तें नवें औषधही सांगितलेल्या ग्रंथा-प्रमाणें थोड्या मुदतींत यथाशास्त्र करून देण्याचें त्यांनीं अभिवचन दिलें आहे. ह्या औषधांबद्दल नवीन शोधाची तयारी चालू आहे. त्यावरून आजमितीस आणखीही औषधें तयार झालीं असतील. पुस्तकांत आणखीही पुष्कळ उपयुक्त माहिती दिलेली असून साधारण रोगांवर अनुपानेंही सांगितलीं आहेत. हें पुस्तक बाळगण्यानें सुद्धां संसारी मनुष्यास पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे. कारण, त्यांत आरोग्य राखण्याच्या संबंधानें साधारण सूचनाही पुष्कळ आहेत."

"आम्ही प्रत्यक्ष तेथें गेलों होतों तेव्हां दक्षिणेकडील नव्या इमार-तीचें काम चाललें होतें. सदरहू इमारत सुमारें ४० हात लांब व १९ हात रुंद आहे, व खर्चाचा अजमास आठ हजार रुपयांचा केला आहे. चारही बाजूंच्या पायामधील सुमारें सहा फूट दगड फोडून

खालीं तळघरासारखी जागा हवा व उजेड आंत यावा म्हणून सभों-वतीं मोठाल्या खिडक्या ठेवून तयार केली आहे. यांत चूर्णें कुटणें, औषधी मात्रा खलणें व यांसंबंधीं यंत्रसामुग्री तयार करून ती व्यव-स्थित रहावी अशा सोईची केली आहे."

"उन्हाळ्यांत उष्णतेची बाधा या ठिकाणीं बिलकूल होणार नाहीं, म्हणून थंड हवेवर जागा पालटण्याप्रमाणें येथें राहून कारखान्याचें काम पाहतां येईल. सभोंवतालचें पाणी आंत येऊन त्रास होऊं नये म्हणून भिंतीच्या बाहेर दुसरी भिंत घालण्याचा विचार आहे. तळमजल्याचे वरील भाग म्हणजे बाहेरून दिसणारा पहिला मजला यांत दप्तर, पोस्ट व रेलवेमार्फतचा व्यवहार, आल्या गेल्या पत्रांची व्यवस्था,ज्याच्या त्याच्या नांवाच्या फायली, निरनिराळे देश, जिल्हे व गांवपरत्वें ठेवणें व इतर वैद्यकपुस्तकसंग्रह व पुस्तक लेखन इत्यादि सर्व व्यवस्था व्हावी, अशी तजवीज करावयाची आहे. यावरील भागही योग्य काळीं मजला देतां येईल अशा तजविजीनें तयार करावयाचा आहे. ही इमारत इतक्यांत तयार झाली असावी. एकंदरींत सर्व कारखान्यांत मिळून चाळीस पन्नास हजार रुपये सुमारें गुंतलेले असावे असा तर्क आहे. पण ही सर्व इस्टेट आंपल्या घरांत मुरावी आपल्या पोरांबाळांनीं मोडून खावी, असा शास्त्री-बोवांचा मुळींच उद्देश नाहीं. त्यांचें म्हणणें ह्या कारखान्यांत वैद्यकीय शाळा असावी; रोग्यांची राहाण्याची वगैरे सोय व्हावी; व विद्यार्थ्यांत जो उत्तम विद्वान् व कारखाना चालविण्यास योग्य ठरेल त्यानें हा सर्व कारखाना पुढें चालवावा. मग तो विद्यार्थी आपल्या घरांतला असो कीं, बाहेरचा असो."

* * *

"ह्या कारखान्याची कीर्ति ऐकून तो पाहाण्यासाठीं आम्ही मुद्दाम गेलों होतों. त्यासमयीं येथील चालकांचें व आमचें बरेंच संभाषण झालें. त्यांत त्यांनीं आपल्या कारखान्याविषयीं जे उद्गार काढले, ते अत्यंत दूरदर्शित्वाचे, खऱ्या कळकळीचे व आर्यवैद्यकाच्या पुनरुज्जीवनास साह्य करणारे आहेत. ते म्हणाले:—

"कोणत्याही धंद्यांत कर्त्याचें मन माघार घेईल असा प्रकार होतां कामा नये. फायदेशीर धंदे लयास जातात ते, आहाराबाहेर खर्च केल्यानें जातात, त्याशिवाय जात नाहींत. कोणत्याही संस्थेचा उत्कर्ष व्हावयाला तिचे चालक पुरुष एकापुढें एक चांगले निपजावे लागतात. म्हणून संततिपरंपरेनें एखाद्या संस्थेचा निरंतर उत्कर्ष होईलच असें मानतां येत नाहीं. आर्यधर्मानें सर्व पुत्रादिक संततीला सारखें मानण्याविषयीं आज्ञा केली आहे. त्यांत त्याचा हेतु परस्परांवर परस्परांचें अत्यंत प्रेम राहून संकटसमयीं परस्परांस मदत करावी असा आहे. पण त्या आज्ञेचा परिणाम आजच्या स्थितीला फारच भयंकर होऊं लागला आहे. म्हणजे पुत्रादिकांची सर्व इस्टेट वाढत्या संसारांत निरुपयोगीपणानें किंवा आपसांतील कलहानें सरकारी स्टांप, वकील, कोर्टें, साक्षीदार यांच्या पायीं नष्ट होऊन बुद्धि, युक्ति, वेळ हींही वाईट मार्गाकडेच खर्च होतात. जहागिरदारांसारखे, इनामदारांसारखे थोर लोकही ह्या योगें धुळीस मिळतात. मग साधारण प्रापंचिकांचा तो किती निभाव लागणार? सात्विक कुटुंबाची अशा प्रकारें वाताहात झालेली पाहिली म्हणजे ह्या समसमान दायविभागाच्या धर्माज्ञेच्या परिणामाबद्दल वाईट वाटतें व ह्या बाबतींत मलबारांतील दायविभागाच्या चाली व आज्ञा मोठ्या फायदेशीर वाटतात. आमच्यांतील दायविभागांच्या चालीनें कुटुंबांतील संपत्तीचाच नाश होतो असें नाहीं, तर एका कुटुंबांतील मनुष्य,

सहोदर इत्यादिक, ज्यांची मदत मिळावयाची, ते शत्रु बनून सर्वतोपरी हानीस कारण होतात, इतकेंच नव्हे, तर गांवांत अगर देशावरही आप्त, स्नेही, ह्या सर्व मंडळींमध्यें मोठ्या दुहीचे तंटे पडतात. अशा स्थितींत एकी होणार कशी? एकी करा, एकी करा, म्हणून हल्लीं जो कंठशोष चालला आहे, त्याच्या मुळाशीं आमच्या मतें हें आपआपसांतील द्वैतच कारण आहे."

"कुटुंबाच्या व समाजाच्या घाताला जें कारण, तें उद्योगी संस्थेला किती बरें घातक होणार? ह्याच्या पायांत कितीकांचे उद्योग रसातळास गेले आहेत! उत्तेजन देणें एका बाजूस राहिलें, पण त्रास न देणें एवढें तरी त्यांनीं करावें कीं नाहीं? पण तेवढें सुद्धां त्यांच्यानें होत नाहीं. व कायदे असे कांहीं चमत्कारिक आहेत कीं, त्यांतून पाहिजे तसा अर्थ निघूं शकतो. ह्याकरितां ज्याला आपल्या संततीनें भांडणतंटा न करितां रहावें, अशी इच्छा असेल, अशा कर्त्या पुरुषानें सर्व मिळकत एके ठिकाणीं ठेवून तिची वहिवाट आळीपाळीनें करण्याविषयीं तजवीज करावी. प्रत्येक स्त्री, पुरुष, मूल ह्यांची व्यवस्था सर्व प्रकारें बांधून टाकावी. विद्या शिकणारा, व्यापार करणारा, ह्यास त्याच्या अक्कलहुषारीप्रमाणें पैसा व्याजीं द्यावा. व अमुक पैसा खर्च केला कीं, त्याचा अंश ह्या इस्टेटींतून निघाला असें ठरवावें. आळशी, व्यसनी, तंटेखोर, असे मनुष्य असतील ते फक्त पंक्तीचे मालक. निराळें राहूं इच्छिणारांचा इस्टेटीवर मुळींच कांहीं संबंध नाहीं. इस्टेटीची व्यवस्था पहाणारे मनुष्य ह्याच कुटुंबांतील पण नोकरासारखे समजावे."

"ज्यांचा परिणाम समाजव्यवस्थेवर घडतो, अशा तत्त्वांचा संबंध एखादी संस्था, कारखाने, देवस्थानें, धर्मादाय, इत्यादिकांशीं आल्यास, ती नामशेष झाल्यास कांहीं नवल नाहीं. ह्याकरितां त्या

त्या संस्था स्थापन करणारांनीं ह्याबद्दल आरंभींच उद्योग करावा हें उचित होय."

" वैद्य लोकांच्या घराण्यासंबंधानें विचार करितां ही गोष्ट प्रत्ययाला येण्यास उशीर नाहीं. मूळ पुरुषानें कष्ट सोसून अनेक पुस्तकें, क्रियांचीं टिपणें, युक्ति, औषधें व तीं तयार करण्याची सामुग्री जमवावी आणि पुढें त्यांचा उपयोग करणारा निघाला नाहीं किंवा वांटणी करण्याचा प्रसंग आला म्हणजे त्या कुटुंबांतील मनुष्यांत तंटे, आळस, ह्यांची वृद्धि होते. आर्यौषधींचा कारखाना व त्यास जोडून वैद्यशाळा ही कल्पना जशी आहे तशीच त्या संस्था कायम राखून शिवाय त्याला त्या कधीं नष्ट होऊं नयेत अशा प्रकारची स्वतंत्रता करून दिली म्हणजे मनुष्यांचें पहिलें कर्तव्य संपलें. शाळेंतील शिष्यांपैकीं कारखाना चालविण्यास सर्व प्रकारें योग्य असा पाहून अनुक्रमें सर्व कामें त्याकडून करवून तो मुख्य चालक समजावा. ही रीति अति उत्तम होय. ह्यायोगें स्वकुलांतील संततीलाही एक प्रकारें उत्तम मार्गास लावल्यासारखें होणार आहे. "

" ह्याकरितां अशी एक संस्था पाहिजे कीं, तींत तयार औषधींचें भांडार, विद्येचें पीठ, औषधी क्रियेची पूर्ण माहिती, व इतरही वैद्यकास लागणाऱ्या अवश्य गोष्टी मिळूं शकतील. अशा संस्थेला राजाश्रय व लोकाश्रय पाहिजे म्हणजे विद्यार्थ्यांची सोय सहज लागते. मग औषधें तयार करावयाचीं, म्हणजे खलबत्त्यापासून प्रारंभ इत्यादि काळजी अनायासें निवारण होईल. अशा संस्थेला राजाश्रय मिळणेंही कांहीं कठीण नाहीं. व तो मिळेपर्यंत म्हणजे कांहीं अडून राहील असाही भाग नाहीं. दहा वर्षांनीं होणाऱ्या कामास फार तर पंधरा वर्षें लागतील इतकेंच. " आणखी ते म्हणाले " पुढील उद्योग

व हेतु बोलून दाखविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तथापि मनांतील संकल्प असा आहे:—

"१ हा कारखाना निरंतर अशाच वाढत्या स्थितींत असावा. कोणत्याही रीतीनें याचा ऱ्हास होऊं नये, अशी तजवीज, आज सुचतील ते अडथळे दूर करून उत्तम प्रकारें करावी.

२ कारखान्याच्या शेजारीं एक वैद्यशाळा स्थापन करावी.

३ औषधीगुण, पृथक्करणानें व अनुभवानें प्रसिद्ध करावेत.

४ शिक्षणासाठीं एक वनस्पतींचा बाग तयार करावा.

५ निराश्रितांस धर्मार्थ औषधें द्यावीं.

६ औषधें घेण्यास येणाऱ्या ऐपतदार मनुष्याच्या रहाण्याची, भोजनाची व करमणूकीची सोय तयार करावी.

७ औषधी तयार करण्याकरितां सर्व यांत्रिक सामुग्री बनवावी.

८ डॉक्टर व वैद्य यांस स्वस्त प्रमाणानें औषधें देतां यावीं अशी तजवीज करावी.

९ एक विद्वान् डॉक्टर, विद्यार्थ्यांस शस्त्रक्रिया शिकविण्यास व गुणदोषपृथक्करण करण्यास ठेवावा.

१० सारांश, वैद्यकाच्या प्रत्येक अंगाचा अभ्युदय व्हावा अशी इच्छा आहे."

"पनवेल येथील आर्यौषधी कारखान्याचे मालक, वे. शा. सं. कृष्णशास्त्री पुराणिक व त्यांचे पुत्र विष्णु कृष्ण पुराणिक, हे होत; हें प्रथम निर्दिष्ट करण्यांत आलेंच आहे. त्यांचेच हे विचार सारांशरूपानें दिले आहेत. हे किती प्रगल्भ, दूरदर्शित्वाचे, व लोककल्याणाचे आहेत हें वाचकांसही सहज रीतिनें समजण्यासारखें आहे. ह्यांतील

संस्थेचा पाया चिरकाल स्थाईक होण्याचीं व शास्त्राच्या उन्नतीचीं तत्त्वें किती विचारानें काढलीं आहेत, हेंही निराळें सांगणें नको. कोणतीही संस्था सुरळीतपणें चालण्याला, किंवा उद्योगाची भरभराट होण्याला, स्वार्थदृष्टि नेहमीं आड येते. ती जो ताब्यांत ठेवूं शकतो, तोच देशहिताला हातभार लावणारा होतो. पण तें काम फार कठीण व मनोनिग्रहाचें असल्यामुळें, तसे पुरुष फारच क्वचित् निपजतात."

" पनवेलचा कारखाना इतक्या उर्जितावस्थेस येण्यास मुख्य कारणांपैकीं खर्चाचा नियमितपणा हें एक होय. त्यांतील उत्पन्नाचा फारच थोडा अंश प्रपंचाकडे जातो. अनेक युक्तिप्रयुक्ति लढवून हलक्या लोकांपासून भारी दर्जाचें काम करवून घेतात. पुढील उद्देश फारच मोठे असल्यामुळें, झालेलें काम कांहींच नव्हे असें त्यांस वाटतें. आणि महत्त्वाकांक्षा व उद्योग ह्यांची झपाट्यानें वृद्धि होत असते. कारखाना पाहावयास आलेल्या लोकांस समजूत देणें; बाहेरगांवच्या लोकांस औषधींसंबंधीं खुलासेवार माहिती देणें, औषधें मागविणारांची होईल तितकी नीट सोय करणें, इत्यादि गोष्टींकडे कारखान्याचे चालक फारच दक्षतेनें लक्ष पुरवितात. ह्यामुळें कोणताही सद्गृहस्थ तेथें जावो, त्याच्या मनांत ह्या कारखान्यासंबंधानें व त्यांतील उद्योगाच्या संबंधानें पूज्यबुद्धि उत्पन्न होते. सर्जन मेजर डिमक, माजी सरकारी मुख्य मेडिकल स्टोअरकीपर, डॉ. गर्दे, डॉक्टर देशमुख, डॉक्टर भाटवडेकर, इत्यादि मोठमोठ्या व तच्छास्त्रपारंगत मंडळींनींही ह्या कारखान्याविषयीं प्रशंसा केली आहे. तसेंच डॉक्टर कावसजी दादा चांदजी ह्यांनीं हा कारखाना पाहून मुंबईच्या ' जमेजमशेद ' नांवाच्या वजनदार गुजराथी पत्रांत केलेलें वर्णनही आम्हां हिंदुलोकांस विशेष भूषणभूत झालें आहे. शिवाय ' पुणेवैभव ' ' विद्याविलास ' ' भिषग्विलास ' ' इंदुप्रकाश ' इत्यादि

वर्तमानपत्रकारांनीं व मासिक पुस्तककारांनीं ह्या कारखान्याचें परि-पूर्ण अभिनंदन केलें आहे. आणि तें अगदीं यथा योग्य आहे."

**कीर्तिरक्षणमातिष्ठ कीर्तिर्हि परमं बलम् ।**
**नष्टकीर्तेर्मनुष्यस्य जीवितं ह्यफलं स्मृतम् ॥**

म. भा. १।२०३।१०

[ कीर्ति राखण्याकरितां झटून प्रयत्न कर. कारण, कीर्ति हें श्रेष्ठ प्रकारचें बल आहे. ज्याची कीर्ति नष्ट झाली, त्या मनुष्याचें जिणें व्यर्थ गेलें. ]





# प्रकरण १४ वें.

## नवी योजना.

**हितं यत्सर्वभूतानामात्मनश्च सुखावहम् ।**
**तत्कुर्यादीश्वरे ह्येतन्मूलं सर्वार्थसिद्धये ॥** म.भा.५।३७।४०

[ सर्व भूतांना जें हितकर आणि स्वतःलाही सुखावह तेंच ईश्वरार्पण बुद्धीनें करीत असावें. कारण, हेंच सर्व गोष्टी सिद्धीस जाण्याचें मूळ आहे. ]

मागील दोन प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें विचार तात्यांचे मनांत ते सज्ञान झाल्यापासूनच येत असावेत असें वाटतें. सन १८७८ सालीं त्यांचें शाळेंतील शिक्षण संपल्यावर पुढें दहा अकरा वर्षांत त्यांनीं थोडाफार वैद्यकीचा अभ्यास घरीं व पुण्यास डॉ. गर्दे यांचेकडे केला. पण त्या पुस्तकी ज्ञानापेक्षां औषधें जास्त प्रमाणावर तयार करून त्यांचा प्रसार सर्वत्र करणें या धंदेशिक्षणाचें ज्ञान त्यांनीं अनुभवानेंच संपादन केलें. त्यास प्रेरक डॉ. गर्दे झाले. सन १८८९ सालीं ते आपला पुण्यांतील शिक्षणक्रम संपवून घरीं आले. पुण्याच्या वातावरणानें त्यांच्या महत्त्वाकांक्षेला बराच जोर आला. सन १८८५ ते १८८९ हीं सालें हिंदुस्थानांतील नवीनच स्थापन झालेल्या राष्ट्रीय सभेच्या चळवळीनें चोहोंकडे जागृति उत्पन्न करणारीं होतीं. रा.

ब. रानडे, चिपळूणकर, टिळक, आगरकर, नामजोशी, गर्दे हे सारे पुढारी पुण्यासच आल्यामुळें पुणें हा या जागृतीचा एक मुख्य केंद्र होता. नेमस्त पक्षाच्या फर्ग्युसन कॉलेजची स्थापना पुण्यास १८८५ सालींच झाली. त्यांत पुढें टिळक आगरकर पक्ष पडून सन १८८७ सालीं टिळकांनीं पुण्याच्या केसरी पत्राचीं सूत्रें आपल्या हातीं घेतलीं. व सन १८८९।९० सालीं तर ते नेमस्तांच्या गोटांतून कायमचेच बाहेर पडले. सन १८८८ सालीं आगरकर यांच्या सुधारक पत्राचा जन्म झाला. नामजोशी यांचे औद्योगिक चळवळींचे लेख मराठा वगैरे पत्रांत येतच होते. याप्रमाणें सामाजिक, राजकीय, औद्योगिक, धार्मिक सार्‍याच सार्वजनिक महत्त्वाच्या प्रश्नांना पुण्यास वाचा फुटली होती. अशा उत्साहपूर्ण वातावरणांतून तात्या पुणें सोडून येतांना कार्याचा उत्साह घेऊनच ते घरीं आले. त्यानंतर लवकरच त्यांनीं त्यांचा आर्यौषधि कारखाना ही संस्था संघटित करण्याचें मनांत आणलें. सन १८९१।९२ सालापासूनच कारखान्याचे हिशेब वेगळे ठेवण्यांत येऊं लागले. सन १८९३ सालीं तात्यांनीं कारखान्याच्या कॅटलागाची पांचवी आवृत्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध केली. यांत चोवीस प्रकारचीं भस्में, बावन प्रकारचीं रसायनें, नऊ कुपिस्थ रसायनें, सतरा प्रकारच्या गुटिका वटिका, सतरा चूर्णें, नऊ अवलेह, अठरा आसवारिष्टें, एकोणीस सत्त्वें क्षार व द्राव, अकरा तेलें–मलमें, चार प्रकारचे अर्क, पन्नास अनुभविक औषधें आणि वीस इतर उपयुक्त किरकोळ औषधें याप्रमाणें यादी आहे. या प्रत्येक औषधाचे गुण, औषधें घेण्याची रीति, औषध योजना, अनुपान योजना, सुलभ औषधि उपाय, रोग्यानें लक्षांत ठेवण्यासारख्या गोष्टी, आरोग्यासंबंधीं सूचना, ठळक खाद्य पदार्थांचें रसात्मक वर्गीकरण व कांहीं महत्त्वाच्या

वैद्यकीय शब्दांचा खुलासा अशी उपयुक्त माहिती असून परगांवच्या ग्राहकांनीं प्रकृतिमान कळवून औषधें मागविण्यासंबंधीं त्यांस जरूर असणारी तपशिलवार माहितीहि दिली आहे. निर्णयसागर छापखान्यांत जनार्दन महादेव गुर्जर व सांडू यांचे मार्फत त्यांचे आरंभींचे हे कॅटलाग छापले जात.

यानंतर सन १८९६ सालीं संस्थेचें नामांतर व आयुर्वेद शाळेचें उद्‌घाटन झाल्यानंतर लवकरच म्हणजे श्रावण शु. १ संवत १९५२ सन १८९६ रोजीं औषधें घेण्याची रीति या पुस्तकांची सहावी आवृत्ति प्रसिद्ध झाली. त्याच्या प्रस्तावनेंत विष्णु कृष्ण पुराणिक लिहितात, "वैद्यशास्त्राचें अध्ययन करीत असतां शिक्षणासंबंधीं अनेक अडचणी येऊं लागल्या. त्यामुळें आयुर्वेद शिक्षणाची पद्धतशीर तजवीज कशी करतां येईल या गोष्टीचा विचार नेहमीं मनांत घोळत असे. वडिलार्जित औषधिक्रियेला कारखान्याचें रूप देऊन तो योग्य प्रकारें चालविल्यास त्यांतून आयुर्वेद शिक्षणाची थोडी तरी सोय करितां येईल असें ध्यानीं आलें. व असें झालें असतां विद्यार्थ्यांस औषधिक्रियेच्या शिक्षणाला मोठी मदत मिळून लोकांना शास्त्रोक्त व निर्दोष अशीं औषधें व उत्तम सुशिक्षित वैद्य असे एकाच ठिकाणांतून मिळूं शकतील. हा आयुर्वेद शाळेचा अंतस्थ हेतु प्रसिद्ध करण्याचा समय ईश्वरानें आणल्याबद्दल त्याचे किती उपकार मानावे!"

"आज १६ वर्षांत या कारखान्यांत तयार झालीं तीं औषधें लोकांपुढें आहेतच. त्यांचेही अनुभव मिळाले. तसेंच औषधांच्या खपावरून समुदायाची श्रद्धा अधिकाधिक दिसून येत आहे. कोणतेंही शास्त्रीय कार्य परंपरेनें चालल्याशिवाय त्यांतील मुख्य प्रक्रिया, युक्ति व तें शास्त्र सर्वथा अस्तित्वांत असत नाहीं."

" वरच्या आमच्या अनुभवानें आतां कारखान्यास शाळा जोडावी, असें मनांत येऊं लागलें; कारण शाळा जोडल्याखेरीज आयुःशास्त्रावर उत्तरोत्तर यथासांग विचार वाढणार नाहींत. ते वाढण्याला शाळाच पाहिजे; पण केवळ कारखान्याच्या उत्पन्नावर प्रचंड शिक्षण कायमचें चालावें कसें हा विचार आला. "

" आयुर्वेदशाला-म्हणजे वैद्यशास्त्र यथायोग्य शिकविणें. ह्या शाळेला आरंभ होऊन प्रस्तुत शिकविण्यासाठीं विद्वान व वैद्यशास्त्रपारंगत असे दोन गुरु [ वे. शा. सं. चिंतामणशास्त्री खरे व कृष्णशास्त्री नवरे ] आहेत. ह्या शाळेची उपजीविका काय ती आर्यौषधि–कारखान्यावर आहे. कारखान्याचें यथाविभाग उत्पन्न ह्या शाळेकडे पोंचतें, तेवढ्यानें शाळा कशी चालावी ही काळजी आहेच. "

याप्रमाणें लिहून या संस्थेस कोणास कांहीं द्रव्य सहाय्य करावयाचें असल्यास तें त्यांनीं करावें असें म्हटलें आहे. मागील प्रकरणांत दिलेल्या केरळ कोकिळ मासिकांतील लेखांतहि श्री. सयाजीराव गायकवाड प्रभृति संस्थानिकांनीं व श्रीमंतांनीं या उपयुक्त संस्थेस मदत करावी अशी शिफारस संपादकांनीं पुढें केली आहे. पण त्याप्रमाणें मदत मिळविण्याचा तात्यांनीं पुढें प्रयत्नच केला नाहीं. हें एका अर्थी फारच चांगलें झालें. कारण त्यामुळें कारखान्याच्या व्यवस्थेंत कोणाहि तिऱ्हाइकाला बोट घालण्याला सवड राहिली नाहीं.

तारीख ९ फेब्रुवारी सन १८९७ रोजीं सखारामशास्त्री यांनीं आपलें मृत्युपत्र लिहिलें. त्यांत त्यांनीं आपल्या आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख केला असून आर्यौषधि कारखान्यांतील सारें भांडवल पुराणिकांचें आहे, आपला त्यांत कांहीं हक्क संबंध नाहीं, असा खुलासा केला आहे. मृत्युपत्रानंतर थोडे दिवसांनीं सखारामशास्त्री यांचा अंत झाला. यानंतर सन १८९८ च्या औषधें घेण्याच्या

रीतीच्या नवव्या आवृत्तींत बऱ्याच सुधारणा दिसतात. औषधांच्या यादींत तयार औषधांची संख्याहि पाऊणशेंनीं वाढली आहे. या आवृत्तीच्या आरंभीं विष्णु तात्या पुन्हा आपल्या आवडत्या संस्थेचा परिचय करून देतांना लिहितातः—

“ **हेतु**—यांत्रिकशक्ति, श्रमविभाग, साहस, कल्पना, समाईक भांडवल, व्यवहारदक्षता, धंद्याची माहितगारी, तिचा काळजीपूर्वक उपयोग व सतत विश्वास इत्यादि कारणांनीं प्रत्येक धंदा ऊर्जिताव-स्थेस येतो. याची साक्ष युरोप व अमेरिका खंडांतील सुधारलेले, तसेंच जपान देशासारखे स्वपराक्रमी देश देत आहेत. तिकडे सर्व प्रकारचे धंदे ऊर्जितावस्थेस आले आहेत; त्याप्रमाणेंच तिकडील औषधें तयार करण्याचे कारखानेही मोठ्या उन्नतावस्थेंत आहेत. पर-कीय औषधांची तूर्त वरप्रमाणें सर्व सोय आहे व त्यांतही राजाश्रय असल्यामुळें आपल्या देशांत इंग्रजी वैद्यक व इंग्रजी औषधें यांचा सर्वत्र प्रसार होऊन त्यास कायदेशीर लायकी आली आहे. पण इंग्रजी औषधें तयार करण्याकरितां लागणारीं मूलद्रव्यें निम्मेहून अधिक आपल्या देशांतून तिकडे नेऊन तेथें त्या द्रव्यांचीं औषधें तयार करण्याचे मोठमोठाले कारखाने स्थापन झाले असून ते नेहमीं वाढत्या स्थितींत आहेत. आपल्या आर्यौषधींच्या गुणांबद्दल सर्वत्र खात्री असून ज्या विद्वान् डाक्टरांनीं इकडे थोडेंबहुत लक्ष दिलें आहे, ते देशी औषधें वापरण्याची इच्छा करितात. व अनुभवाअंतीं हळू हळू त्यांच्या नजरेस असें येतें कीं, हीं औषधें बहुतकरून सर्व प्रकृतीला सारखींच मानवतात व चिरगुणकारी होतात. ज्या आमच्या आर्य वैद्यांनीं औषधांसंबंधानें अनेक शोध केले ते विद्वान् असून वाचन आणि शोधन यांमध्यें आपला अहोरात्र वेळ खर्च घालीत असत व त्यांची जन्म-भूमि हीच असल्यामुळें आणि ते मांसभक्षक मुळींच नसल्यामुळें त्यांनीं

केलेले अनेक अनुभविक उपचार या देशांतील धान्यभक्षक प्रजेला ( ही प्रजा नऊदशांश आहे ) पुष्कळ हितावह झालेले आहेत. आर्यौषधींचा लोप होण्यास जीं कारणें आहेत त्यांतील मुख्य कारणें, तयार औषधांची दुर्मिळता व कायदेशीर लायकीचा अभाव व केलेलीं औषधें बिनचूक आहेत असें पृथक्करणशास्त्रानें ठरविणाऱ्या शास्त्रवेत्त्यांची उणीव हीं होत. "

" सशास्त्र औषधें तयार करणें व वैद्यकी करणें ह्या दोन्ही गोष्टी एका व्यक्तीस दुर्घट आहेत. आणखी सशास्त्र अनुभविक औषधें विपुल व स्वस्त अशीं तयार करण्याचें काम साधारण प्रमाणानें होणें अशक्यच होय. कारण खर्च फार, मेहनत अतोनात, व रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून बसल्याप्रमाणें त्यांत दक्षता पाहिजे असें तें काम आहे. तथापि याप्रमाणें सर्व विचार होऊन आर्यौषधींचा उपयोग करणाऱ्या डॉक्टर, वैद्य, आणि कुटुंबवत्सल, यांस **हवें तें औषध आयतें व विपुल मिळावें**, या हेतूनें हा **आर्यौषधींचा कारखाना** सुरू झाला."

पण याच आवृत्तीच्या प्रस्तावनेंत प्लेग दुष्काळ या अनिष्ट सूचक कालाकडे नजर देऊन विष्णु तात्या लिहितात:—" प्रत्येक व्यक्ति स्वतः व आप्त इष्ट, मित्र यांकरितां अगर व्यवहार, व्यापार यांकरितां अनेक प्रकारें काळजी, दुःख व विपत्ति सोशीत आहे. याप्रमाणें सर्व महाराष्ट्र व त्यामुळें सर्व आर्यभूमि या सांथीच्या भीतीनें अगदीं त्रस्त व भ्रमिष्ट बनली आहे म्हटलें तरी चालेल !" [ या सांथीवर अनुभविलेले या कारखान्यांतील औषधि उपचार निराळे पुस्तक रूपानें प्रसिद्ध केले आहेत. ]

"अशा वेळीं कारखान्याची वाढ किती झाली, शाळा कशी चालली आहे, आणखी नवीन कार्य बेत केले आहेत व ते कशा प्रकारें पुढें

येणार आहेत इत्यादि जें कांहीं अवश्य कळविणें तेंही हल्लींच्या प्रसंगीं सर्वांचीं मनें अस्वस्थ असतां कळवावें असें आमचें मन घेत नाहीं. पण इतकें कळविणें अगदीं अवश्य आहे कीं, आज माघ शु. ५ गुरुवार संवत १९५४ पर्यंत श्रीधूतपापेश्वर कृपें कारखाना पूर्वरीती-प्रमाणें, वाढत्या स्थितींत असून नूतन आरंभलेली शाळा सुरू आहे. संस्थेसंबंधानें सर्व व्यवस्था होत आहे व ती स्वस्थता मिळतांच प्रसिद्ध करण्यांत येईल. ”

यानंतर सुमारें दोन महिन्यांनीं कालाची क्षणभंगुरता पाहून श्रीधूत-पापेश्वर आरोग्य मंदिर या खाजगी संस्थेची योजना एकदां निश्चित केलेली असावी म्हणून मिति चैत्र कृ. २ संवत १९५४ ता. ८ एप्रिल सन १८९८ रोजीं कृष्णशास्त्री यांनीं नवीन योजनेचा एक लेखी खर्डा तयार केला. त्यांतील कांहीं महत्त्वाचीं कलमें खालीं देत आहे.[१]

“ अत्रिगोत्रोत्पन्न ऋग्वेदी आश्वलायन शाकल शाखाध्यायी कृष्णाजी नारायण पुराणिक धंदा वैद्यकीचा रा. पनवेल.... कळवितों कीं:—

उद्देशः—आपल्या देशांत प्राचीन वैद्यशास्त्राचा लोप होत चालला आहे, औषधिक्रिया बुडत चालली आहे, जुने ग्रंथ मिळतनासे झाले आहेत, नवीन ग्रंथ करण्याइतकी विद्यासंपन्नता नाहींशी झाली आहे. याचें कारण विद्वान् वैद्याचें लक्ष शिष्य तयार करण्याकडे न लागतां कुटुंबपोषणाकडे लागतें. व एकदां तिकडे लक्ष लागलें म्हणजे कितीहि पैसा मिळाला तरी मिळालेल्या अनुभवाचा लाभ

(१) हा तपशिल कांहीं वाचकांस कदाचित कंटाळवाणा वाटेल. याचें कारण औद्योगिक पुरुषांचीं चरित्रें वाचण्याची आपल्याला संवय नाहीं इतकेंच. एरव्हीं आर्यौषधि कारखान्याच्या संस्थापकाचे चरित्रांत कारखान्याचेंहि चरित्र तपशिलवार येणें यांत विषयांतर किंवा पाल्हाळ होत नाहीं.

तत्कालीन लोकांस देण्यापलीकडे पुढील पिढीच्या रोगार्तांस देण्यांत येत नाहीं. असें न व्हावें आणि—

१ शिक्षण उत्तम प्रकारें मिळण्याची तजवीज व्हावी.

२ गुरु व विद्यार्थी आपआपल्या धर्मानें रहावेत, व ह्या योगें प्राचीन वैद्यशास्त्र पूर्ण दशेस येण्याचा उद्देश सिद्धीस जावा.

३ उत्तम विद्वान् झालेल्या शिष्यांचें कुटुंबपोषण होऊन जुने ग्रंथ उत्तम टीकेसहित प्रसिद्ध व्हावेत. व नवीन अनुभविक ग्रंथ तयार व्हावेत.

४ गरीब व श्रीमंत लोकांस घेतां येण्याजोगीं सर्व प्रकारचीं औषधें यथायोग्य तयार व्हावींत.

५ गरीब व निराश्रित रोग्यांस फुकट औषधें मिळावींत.

६ औषधांचे अनुभव पाहतां यावेत. इत्यादि कारणांकरितां हल्लीं आमच्या पनवेल येथें असलेल्या आर्यौषधि कारखान्याचा श्रीकल-स्वामींनीं आर्यादुर्गा प्रसादानें श्रीधूतपापेश्वर चरणीं उत्सर्ग करण्याचा संकल्प केला आहे. आजपासून[1] या संस्थेचें नांव श्रीधूत-पापेश्वर आरोग्य मंदिर असें चालावें. या संस्थेस एक प्रतिनिधि, एक मुख्य एजंट व एक चालक असे तीन अधिकारी संस्थेची सर्व व्यवस्था पाहण्याकरितां असावेत.

**प्रतिनिधिः**—हा आमच्या वंशांतील योग्य पुरुष असावा. मी आहें तोंपर्यंत किंवा मी काम सोडीन तेथपर्यंत प्रतिनिधीचें काम स्वतः पाहीन.

---

१ हा संकल्प सन १८९६ सालचा आहे. पण त्यास या लेखांत प्रथमच कायदेशीर नसलें तरी व्यवस्थित स्वरूप येत असल्यामुळें 'आजपासून' असे शब्द वापरले असावेत. याचवेळीं श्रीधूतपापेश्वरमंदिर ही कारखान्याची ट्रेडमार्क सुरू झाली.

**मुख्य एजंटः**—हा आमचे वंशांतील योग्य पुरुष असावा. त्यानें वैद्यशास्त्राचें अध्ययन चांगले प्रकारें केलेलें असावें. हा कारखाना उन्नतावस्थेंत येण्याकरितां हरएक बाबतींत, व तो चिरस्थायी व्हावा म्हणून त्याचा उत्सर्ग करणें व आयुर्वेद शाळा स्थापन करणें इत्यादि सर्व बाबतींत, चिरंजीव विष्णु कृष्ण पुराणिक यानें नेकीनें अश्रांत श्रम घेतलेले आहेत व याचप्रमाणें पुढेंहि श्रम करण्याची त्यांची अत्यंत उमेद असून आजपर्यंत कारखाना योग्य रीतीनें चालविण्यास त्यांचें धोरण सर्वस्वी उपयोगीं पडलें आहे, करितां पहिले मुख्य एजंटचें काम चिरंजीव विष्णुतात्या यांनीं करावें.

**चालक**—संस्थेच्या आयुर्वेद शाळेंत तयार झालेला, हुशार, विद्वान्, उद्योगी, संस्थेच्या कळकळीचा निस्पृह व विश्वासु अशा लायक मनुष्याची नेमणूक चालक म्हणून प्रतिनिधी व मुख्य एजंट यांनीं करावी. देशस्थ, कोंकणस्थ, कऱ्हाडे या तीन ब्राह्मण जातींपैकीं तो कोणत्याहि जातीचा असावा. पुराणिक वंशांतील नसावा.

यानंतर कारखान्याच्या उत्पन्नाची विभागणी कशी करावी, त्यांतून प्रतिनिधि, मुख्य एजंट व चालक यांस शेंकडा किती रुपये मिळावे, आयुर्वेद शाळेला किती द्यावे, नोकरांनीं शपथपूर्वक इमानें इतबारें कसें काम करावें, संरक्षक मंडळ व त्यांच्या सभा केव्हां भराव्या वगैरे अनेक तपशिलवार कलमें आहेत. आणि तूर्त कारखान्याचें उत्पन्न पुरेंसें नसल्यामुळें व जागेच्या वगैरे सर्व सोयी लागल्या नसल्यामुळें सदरील योजनेप्रमाणें व्यवस्था संवत १९५६ अखेर म्हणजे सन १९०० सालापासून अंमलांत यावी अशी कृष्णशास्त्री यांनीं आपली इच्छा नमूद करून ठेविली आहे.

परंतु सन १८९७ सालानंतर साऱ्याच देशावर व विशेषें करून पुराणिक घराण्यांवर संकटकाल आला! यामुळें वरील योजनेची

सर्व बाजूंनीं अंमलबजावणी होणें शक्य झालें नाहीं. त्याचा खुलासा पुढें होईल.

> वैद्याश्चाप्यातुराः सन्ति बलवन्तश्च दुर्बलाः ।
> श्रीमन्तश्चापरे षण्ढा विचित्रः कालपर्ययः ॥
>
> म. भा. १२।२८।२२ ]

[ वैद्यांना सुद्धां रोग होतात. आणि बलवान देखील दुबळे ठरतात. तसेंच कित्येक श्रीमंत लोक नामर्द असतात. ही कालाचीच विचित्र गति आहे. ]






## प्रकरण १५ वें.

ज्येष्ठ एव तु गृह्णीयात्पित्र्यं धनमशेषतः।
शेषास्तमुपजीवेयुर्यथैव पितरं यथा ॥

मनु. ९।५

( ज्येष्ठ पुत्र जेव्हां धार्मिक असतो तेव्हां त्यानेंच पित्याचें सर्व धन घ्यावें व कनिष्ठ भ्रात्यांनीं वस्त्र, आच्छादन इत्यादिकांकरितां पित्याप्रमाणेंच त्याच्यावर अवलंबून राहावें. )

मागील प्रकरणाच्या अखेरीस सूचित केल्याप्रमाणें पुढें प्राप्त झालेल्या संकटकालाचें वर्णन वाचण्यापूर्वीं वाचकांस तात्यांच्या बाह्याभ्यंतर स्थितीची माहिती असणें जरूर आहे. शिवाय चरित्राच्या दृष्टीनेंहि तात्यांच्या संबंधीजनांचा अल्प परिचय करून देणें अगत्याचें आहे. यास्तव या चरित्रवर्णनाच्या परिपोषणाला जरुरीपुरताच

तात्यांच्या परिवाराचा, परिस्थितीचा व स्वभावाचा अल्प परिचय या प्रकरणांत करून देत आहें.

माघ वद्य ११ गुरुवार ता. ७ फेब्रुवारी सन १८८४ रोजच्या हरिदिनीं तात्यांचे आजोबा नारायणशास्त्री वारले. त्याच्या आदल्या सालीं जयराम नाना वारले. नारायणशास्त्री हे बहुश्रुत व जयराम नाना हे कर्मठ शुचिर्भूत पुरुष असावेत असें दिसतें. पण पनवेलचे नागरिक म्हणून त्यांनीं कोणत्याहि सार्वजनिक कार्यांत विशेष भाग घेतला किंवा दुसरें कांहीं विशेष कार्य केलें, असें ऐकिवांत नाहीं. दोघेहि पुराणाच्या पोथ्या सोडून वाचीत असत व त्यांतच रमत असत. याशिवाय दुसऱ्या कोणत्याच कार्याकडे त्यांनीं लक्ष दिलें नसावें. त्यांच्या या धार्मिक वृत्तीचा परिणाम तात्यांच्यावर झाला असला पाहिजे. कारण तात्यांनीं आपल्या जाणतेपणांत त्यांस पाहिलें होतें. व तात्यांनींहि गुरुचरित्रादि ग्रंथांचीं अनेक पारायणें केलीं होतीं.

**शुद्ध बीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥** असें सुप्रसिद्ध संतवचन आहे. या वचनांतील शुद्ध बीज याचा अर्थ काय करावा, हा प्रश्न थोडा विवादी होण्याचा संभव आहे. जगांत सूर्यापोटीं शनैश्चर अशीं उदाहरणें आढळतात. उलट हिरण्यकश्यपूच्या पोटीं प्रल्हाद अशींहि उदाहरणें प्रसिद्धच आहेत. तसेंच एकाच कुळांत कौरव आणि पांडव, रावण आणि बिभीषण असेहि प्रकार आढळतात. कार्बन या एकाच जातींत हिरा आणि कोळसा हे पदार्थ उत्पन्न होतात. शुद्ध आणि निर्दोष असें एक ब्रह्म मात्र आहे. तेंच एक पूर्ण आहे. बाकी सारे अपूर्णांकच आहेत. या अपूर्णांकाची किंमत अंशावर असते. $\frac{1}{4}$ पैशाची किंमत एक पै देखील नाहीं. $\frac{1}{4}$ मोहोरेची किंमत अंश व छेद तेच असून किती तरी पटीनें अधिक

आहे. कारण एक अंश तांब्याचा व दुसरा अंश सुवर्णाचा आहे. तांब्याचें सुवर्ण करण्याची किमया ज्यांना साधते तेच कर्तबगार पुरुष होत. साधुसंत तेच. छेद ही माया आहे. ती उपाधि आहे. ती अपरिहार्य परिस्थिति आहे. तें प्रारब्ध आहे. हा छेद नाहींसा करण्याचा एकच मार्ग आहे, तो हा कीं, अंशाची किंमत वाढविणें. छेदाचे बरोबरीनें अंश असला म्हणजे तो ईश्वरच झाला. छेदाची मायोपाधि त्याच्या पूर्णत्वाला बाधा आणीत नाहीं. अंशाबरोबरच छेदाची पट करण्यानें अंशाची किंमत वाढत नाहीं. व्याप तितका संताप होतो. केवळ लोकप्रीतीनें, लोकसंग्रहानें व्यक्तिस्वरूप जो ईश्वरांश त्याची किंमत वाढत नाहीं. गुणांबरोबर दोष वाढतात, आणि अंशाची संख्या फुगली तरी परमार्थ दृष्टीनें त्याची किंमत चढत नाहीं. अंशाची किंमत वाढविणें हाच पुरुषार्थ होय. उपाधिभूत जो छेद तो मुळींच न वाढवितां अंशानें आपलेंच महत्त्व वाढवीत जाणें हा ईश्वररूप होण्याचा केवळ निवृत्तिपर असा मोक्षमार्ग होय. छेदरूप ऐहिक उद्योगाची थोडी अपरिहार्य वाढ सहन करून अंशानें तारतम्यानें आपली किंमत वाढवीत जाणें हा निवृत्तिगर्भित कर्मयोग होय. या प्रकरणाचे मथळयांत कर्ता असें म्हटलें आहे तें ह्या कर्मयोग्यालाच उद्देशून आहे.

ह्या कर्त्याच्या कर्तबगारीचें महत्त्व लक्षांत येण्यासाठीं मूळ अंशाचें छेदासहित स्वरूप लक्षांत घेतलें पाहिजे. जीव हा ईश्वराचाच अंश खरा. पण देहापासून तों विश्वकुटुंबापर्यंत लहान मोठ्या प्रपंचरूप छेदाचें त्याच्या गळयांत लोढणें अडकविलेलें आहे. कधीं कधीं हीं लोढणीं सांगडेच्या ओंडक्यांप्रमाणें या भवसागरांत तारक होतात, कधीं कधीं संसारचक्रांतील पिष्टपेषणाच्या या तळी भवसागरांत तळाला नेतात, बुडवितात ! या कर्तव्याच्या अनेक

जबाबदाऱ्या गळ्यांत असूनहि जे तरतात ते मोठेच कर्मयोगी होत. अंशस्थानीं असलेलें यांचें व्यक्तित्व निःसंग व निरहंकारी असेल तरच कर्तव्याचा भार त्यांना बुडवूं शकणार नाहीं. हें व्यक्तित्व प्राक्कर्मानेंच प्राप्त होत असतें.

**तात्पर्य, शुद्ध बीजा पोटीं। फळें रसाळ गोमटीं।**

यांतील शुद्ध बीज म्हणजे ज्याचें त्याचें प्राक्कर्मबीज असच मानावें लागतें. एकाच भूमींत एकाच हातानें सीताफळ व रामफळ, कारलें व पडवळ, अशीं सारखींच बीजें पेरलीं, व त्यास त्याच हातानें सारखेंच पाणी घातलें, तरी सीताफळीच्या बीजाला सीताफळें व रामफळाच्या बीजाला रामफळेंच येतील. सीताफळाचा हिंवताप आणण्याचा अवगुण रामफळाला लागणार नाहीं व कारल्याचा कडूपणा पडवळाच्या भाजीला येणार नाहीं. पण असें असलें तरी जमीन, पाणी, खत, आणि मशागत यांचाहि विचार फलदृष्टीनें व्यर्थ नसतो. त्याच-प्रमाणें व्यावहारिक दृष्टीला आनुवंशिक संस्कार व जन्मानंतरच्या अनुकूल प्रतिकूल परिस्थितीचे व संपत्तीचे परिणाम हे जम्मेस धरावेच लागतात. आपण सोयरिक जमवितांना सोयऱ्यांचें कुलशील पाहातों. माणसाची किंमत त्याच्या स्नेह्यांवरून करावी अशी एक इंग्रजींत म्हण आहे. अशा दृष्टीनें विचार करितां तात्यांच्या ठिकाणची जी संरक्षक पवित्र धर्मभावना दिसते, तो त्यांचा स्वतांचा व त्यांच्या कुलाचाहि विशेष होय. अशाच रीतीनें तात्यांचे कौटुंबिक संबंधांचा व कुटुंबांतील त्यांच्या वैशिष्ट्याचा विचार येथें कर्तव्य आहे.

तात्यांचे आईबाप भाविक आणि सात्विक होते. तात्यांच्या वडिलांचा परिचय मागील प्रकरणांतून झालेलाच आहे. तात्यांचा आपल्या वडिलांशीं संबंध वाजवीपेक्षांहि जास्त संकोचाचा व मर्याद-शीलपणाचा होता, असें दिसतें. ता. २२ डिसेंबर सन १८९९ चे

एका पत्रांत ते लिहितात, "श्रीघोपेश्वरीं येण्याविषयीं ती. सौ. मातुश्रींनीं ती. अण्णांजवळ (तात्यांचे वडील) गोष्ट काढली. पण आज्ञा मिळाली नाहीं.... ती. अण्णांजवळ अशा कोणत्याहि बाबतींत मत देण्याशिवाय कांहीं बोलण्याचा आजपर्यंतचा सराव नाहीं व नकारवाचक उत्तर अद्याप कधींहि घेतलें नाहीं." या खेपेला तात्यांना मातोश्रींना मध्यस्थीं घालावें लागलें. तरी त्यांना परवानगी मिळाली नाहीं. म्हणून ते गेले नाहींत. तीन वर्षांमागें कारखान्याच्या उत्सर्गाचे कल्पनेस वडिलांची मान्यता मिळविण्यासाठीं तात्यांना त्यांचे मित्र दत्तोपंत सांडू यांस मध्यस्थ करावें लागलें. तात्यांसारखा अत्यंत सुशील, सुवृत्त, व कर्तृत्ववान् पुरुष आपल्या वयाच्या तीस पसतीसावे वर्षीं याप्रमाणें आपल्या वडिलांची जी मर्यादा पाळतो, ती आजच्या तरुणांनीं लक्षांत घेण्यासारखी आहे. तात्यांचा ह्या मर्यादशीलपणा थोडा जास्त वाटतो खरा, पण त्याबरोबर हेंहि लक्षांत घ्यावें कीं, विष्णु तात्यांचा शब्द वडिलांनींहि फारकरून मोडला नाहीं. उभयपक्षीं असा समंजसपणा असतां व्यक्तिस्वातंत्र्यापेक्षां वडिलांच्या मर्यादेचें बंधन जास्त शोभादायक, संरक्षक, व भूषणावह ठरतें. पण वडिलांची मर्यादा पाळणें म्हणजे एकमेकांनीं एकमेकांशीं मन मोकळें करून बोलावयाचेंहि नाहीं, असें मानण्याचें कारण नाहीं. वडिलांच्या व त्यांच्या विचारांत मतभेद असल्यामुळें तात्यांचा हा अबोलका भिडस्त स्वभाव त्यांस प्रसंगविशेषीं फारच जाचक झाला असला पाहिजे, हें उघड आहे. पण तसें असलें तरी त्यांनीं वडिलांचे विद्यमानेंच सर्व कारभार चालविला. कारखान्याचा सर्व पैसाअडका वडिलांजवळच ठेवला त्यांच्या स्वतःजवळ कधीं एक पैसाहि नसे. कारखाना आरंभीं, त्यांच्या वडिलांच्या मालकीचा व नंतर ते त्याचे प्रतिनिधि असें त्यांचेंच नांव तात्यांनीं मिरविलें, हें त्यांच्या कर्तृ-

त्वास भूषणच झालें. उलटपक्षीं, कारखान्याच्या व्यवस्थेंत पुढें कृष्णशास्त्री यांनीं मुळींच ढवळाढवळ केली नाहीं, तात्या करतील तें प्रमाण असेंच चालूं दिलें.

पण तात्यांची अपेक्षा याहून थोडी जास्त होती. ती अखेरपर्यंत पुरली नाहीं, असेंच दिसतें. घरांत जो विशेष कर्तृत्ववान् पुरुष असेल त्याला वडिलांकडून आपल्या कार्यक्रमांत प्रतिकार होऊं नये, इतकेंच नव्हे तर त्याला व त्याच्या बायकोला घरांत विशेष सुख लाभेल अशी सर्वांनीं दक्षता ठेवावी. आईबापांनीं अशा कर्त्या मुलाला पक्षपात बुद्धीनें वागविणें केवळ क्षम्य नसून धर्म्य आहे, आणि अवश्यच आहे, अशी त्यांची भावना होती. पण आपल्याकडे एकत्र हिंदु कुटुंबांत ही भावना पाळली जात नाहीं. कर्ता पुरुष कष्ट करीत असतो व त्याच्या जीवावर इतर मंडळी विश्रांतिसुख भोगतात आणि आईबापांचें प्रेमहि कर्त्या मुलापेक्षां जो सर्वांत लहान, द्वड किंवा पंगू असेल त्यावर जास्त असतें. "ज्यास आपंगिता नाहीं। त्यास धरी जो हृदयीं॥" अशी आईबापांची दयाळू दृष्टि असते. ज्यावर इतर कोणी फारसें प्रेम करणार नाहींत, त्यावर आईबाप ज्यास्त लक्ष ठेवून त्याचा सांभाळ करितात.

तात्यांची अगदीं गरिबी असतां ते आपल्या आईला म्हणत "आई मी तुला पोतें भरून रुपये आणून देईन." कुंतीनें गजगौरी व्रताचा संकल्प केला, तेव्हां तिला पूजेला गज आणून देण्यासंबंधीं "भीम म्हणे मी असतां नाम वदावें किमर्थ पांचांचें" या भीमाच्या जय-गर्जनेप्रमाणें तात्यांची वरील दर्पोक्ति त्यांच्या कर्तृत्वास शोभणारीच होती. पण याप्रमाणें कर्तृत्वानें जो सर्वांपेक्षांहि वडील झाला, त्याच्याबद्दल आईला वात्सल्य वाटत नाहीं. उलट, प्रभु रामचंद्राला व्यर्थ तसदी पडूं दिली म्हणून अंजनामातेनें हनुमंताची आणखी

हजेरी घेतली ! आईच्या हृदयांत असे हे विसंगत कप्पे दिसतात. पण चंडी आणि जगदंबा अशीं जगन्मातेचींच दोन रूपें आहेत. माकडिणीचीं हुशार पोरें त्यांची आई या झाडांवरून त्या झाडावर उड्या मारतांना तिच्या पोटाला घट्ट बिलगतात, त्यामुळें त्यांची काळजी तिला घ्यावी लागत नाहीं. पण मांजरी आपलीं पिलें तोंडांत धरून उड्या मारीत जाते तेव्हां तीं दुबळीं पिलें पडूं नयेत व त्यांना आपले दांतहि रुतूं नयेत, ही काळजी मांजरीलाच घ्यावी लागते. निसर्ग असा आहे. पित्याची कडक शिस्त व मातेचा कनवाळूपणा यांत निसर्गाचीं हीं दोन रूपें विभागलीं आहेत. कधीं कधीं मातेच्याच ठिकाणीं मुलामुलांत हा दुजाभाव वरीलसारख्या कारणांस्तव दिसून येतो. यांत आपल्यास विसंगति वाटते, तितकी वास्तविक नसते. उलट, ईशनियतींतील समता, अथवा उणीवभरपाईच त्यांत दिसून येते.

ज्येष्ठपणाचा हक्क कोठें कोठें कायद्यानेंहि मानला जातो. इंग्लंडच्या कायद्यांत कुटुंबाची सारी इस्टेट एकस्या ज्येष्ठ पुत्रालाच मिळावी अशी ज्येष्ठ पुत्राचीच विशेषी काळजी घेतली आहे. पण ह्या ज्येष्ठपणाचे वारशाचे हक्काबद्दल आपलें काय मत आहे, म्हणून डॉ. जॉनसन यांस विचारतां त्यांनीं शांतपणानें उत्तर दिलें कीं, “ कुटुंबांत फक्त एकच पुरुष आळशी व मूर्ख रहावा, ही परंपरा राखण्याचा गुण या चालींत दिसतो ” प्रकरणाच्या आरंभींच्या मनूच्या वचनांत ज्येष्ठ म्हणजे गुणानेंहि ज्येष्ठ हा भाव स्पष्ट आहे. पण गुणानें ज्येष्ठ असणारासहि अशा प्रकारची सवलत कायदा व व्यवहार आपलेकडे देत नाहीं.

कार्यनिष्ठेच्या दृष्टीनें संसारिक अडचणींपासून आपण अलग राहूं तर तितकें आपलें अधिक सामर्थ्य इतर अंगीकृत कार्याकडे खर्च होऊं शकेल, असें कर्त्या पुरुषाला स्वाभाविकच वाटत असतें. पण ही गोष्ट लक्षांत घेऊन कौटुंबिक माणसें त्यास निर्वेध स्वास्थ्य मिळावें, यासाठीं

जपत नाहींत. यामुळें कौटुंबिकांचें स्वभाववैचित्र्य, त्यांचे मतभेद, त्यांची धुसपुस आणि भांडणें यांचा मेळ घालून त्यावर आपल्या उदार बुद्धीचें पांघरुण घालण्यांतच कर्त्या पुरुषाच्या शक्तीचा अपव्यय होतो, व त्याला स्वास्थ्य न मिळून त्या तितक्या प्रमाणांत अंगिकृत कार्यास तो असमर्थ बनतो.

कार्याच्या महत्त्वाचें तारतम्य सामान्य जनांस असत नाहीं. घरांतील वडील पुरुष जर घरांतील साऱ्या लहान मुलांस तासं तास संभाळील, शेणगोळ्यापासून घरांतील सारीं हलकीं कामेंहि पाहील, सर्वांशीं हंसून खेळून मोकळ्या मनानें पुष्कळ बोलेल, सर्वांना यथास्थित खाऊं पिऊं घालील, व त्याबद्दल वरचेवर चवकशी करील, लहानांत लहानासारखा व मोठ्यांत मोठ्या सारखा वागेल, तर तो सर्व कौटुंबिकांस प्रिय होतो. आपला काल व पैसा यांचा जो मोकळेपणानें स्वकीयांकरितां व्यय करतो तो दिलदार ठरतो. पण जो सदा आपल्या कार्याच्या व्यवधानांत असतो व सारा काल व पैसा याचा त्यांतच वेंच करतो, त्याचें तें कार्य किती महत्त्वाचें असो, तो कर्तबगार पुरुष कुटुंबांत तितका प्रिय होत नाहीं. व त्याच्या स्वास्थ्याची व सुखाची विशेष प्रेमानें कोणीच काळजी घेत नाहीं !

गांवांत व राष्ट्रांतहि जे पुरुष खरे शारदोपासक, संशोधक, यांत्रिक, कलावंत व उद्योगशील असतात, त्यांच्याकडे लोकांचें लक्ष नसतें. जो आल्या गेल्यास दूध, चहा, कॉफी, चिवडा, लाडू देतो, यथास्थित गप्पा मारतो, गांवकुटाळांस संभाळतो, सत्ताधीशांच्या प्रकाशांत चमकतो, व जो धूर्तपणानें अथवा चैनीनें थोडी पदरमोडहि करितो, तसेंच सभास्थानांतील गालीचे, निवडक खुर्च्या व वर्तमानपत्रांतील रकाने यांतील आपल्या राखींव जागा दक्षतेनें संभाळतो; तो पुरुष सामान्य लोकांच्या प्रीतीचा केंद्र बनतो. अशा धूर्त व दिलदार माणसांचाहि

व्यवहारांत उपयोग असतो. नाहीं असें नाहीं. दिलदार माणसें मनुष्याचें बळ सहज मिळवितात. पण जीवाच्या ठिकाणीं असलेल्या ईश्वरी अंशाचें महत्त्व या सामान्य दिलदारीपेक्षां अधिक आहे. दहा माणसांना जोडून घेणारा सामान्य लोकसंग्रहकारी पुरुषच काय, पण कोट्यावधि प्रजेवर प्रेमानें ताबा चालविणाऱ्या उदार राजापेक्षांहि संयमनानें व एकाग्रचिंतनानें आत्मविकास करणाऱ्या एकदेशी कर्तबगार पुरुषाची योग्यता सनातन आर्य संस्कृतींत अधिक ठरते. मग लौकिकांत त्यांचें महत्त्वमापन कसेंहि होवो.

तसेंच, जगाच्या इतिहासांत ज्या महत्त्वाच्या कार्याची आजवर नोंद झाली आहे, तीं कार्यें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, यांपैकीं कोणत्याही वर्णाची असोत, सद्ग्रंथ, रणसंगर, इष्टापूर्त कार्यें, कलाकौशल्याचीं कामें, परोपकाराचीं कृत्यें अशा अनेक प्रकारच्या कार्याची नोंद लोकरंजक ग्रंथांत ज्यांच्या नांवावर झाली आहे, त्या पुरुषांच्या बरोबरीनें किंबहुना त्या पुरुषांच्याहून कितीतरी जास्त परिश्रम, बुद्धिमत्ता व स्वार्थत्याग, इतर अज्ञात पुरुषांचे त्या कामीं खर्चीं पडलेले असतात. त्यांची क्वचित्च कोणास माहिती असते. लोकांच्या अनास्थेंत पडून राहिलेले शंभर नंबरी सोन्यापेक्षांहि लोकदृष्टीच्या व भुलभलाईच्या झिलईत सोनपितळच अधिक चमकून राहातें ! धूळ खात पडलेला हिरा असला, वारुळांत झांकलेला तपस्वी असला, मोठ्यांचे छायेंत एकादा सत्त्वसंपन्न आश्रित असला, एकांतांत चिंतन किंवा प्रयोग करणारा एखादा लेखक किंवा शोधक असला, बिनबोभाट लोकसेवा करणारा एखादा स्वयंसेवक असला, गुप्त दान देणारा एखादा दाता असला, किंवा जनसंमर्दाच्या "हो, हो; आणि हाः हाः" मध्यें न मिसळतां आपल्या सत्कार्यांत गुंतलेला एखादा कर्ता पुरुष असला, तर त्यास कोणीच बहुधा विचारीत नाहींत. अशी ही

जनरीत आहे ! पण आपल्या चरित्र नायकांनीं कौटुंबिक आणि ग्रामस्थ यांच्या प्रीतीपेक्षां कार्यनिष्ठेकडेच जास्त लक्ष दिलें.

त्यांनीं लहानपणापासून फार कष्ट केले. कारखान्याचीं आरंभींचीं वीस पंचवीस वर्षें तात्यांजवळ विशेष नोकर चाकर ठेवण्यास पैसा नव्हता. अशा वेळीं भट्या बांधणें, वनस्पति कुटणें, अशीं कष्टांचीं कामेंहि तात्यांनीं स्वतां अंग मोडून केलीं ! ऐषआराम भोगण्यास त्यांना त्यांच्या साऱ्या हयातींत कधींच मिळाले नाहींत. उलट ‘ वाटी त्याला पाटी ’ या न्यायानें त्यांच्या वाट्याला सदा कष्ट, दगदग व चिंता हींच आलीं ! इतरांनीं खुशाल सुख भोगावें व तें आपण पहावें, अशी एकत्र कुटुंबांतून पूर्वीं तरी कोणाकोणा कर्त्या पुरुषांची भावना असे. तात्यांचें म्हणणें कर्त्या मुलानें कष्ट करण्यास व जबाबदारी उचलण्यास सदा तत्पर असावें. पण त्याच्चबरोबर वडील माणसांचा मायेचा हात विशेषें करून त्यांच्या पाठीवरून फिरत असावा व इतर कौटुंबिकांनीं तो व त्याची बायको यांस शक्य तितकें सुख, विश्रांति व मान देण्यास प्रेमानें झटावें. ही तात्यांची अपेक्षा कोणाला न्याय्य वाटेल तर कोणाला स्वार्थमूलक व अनुदारपणाची वाटेल. कांहीं असो. ही त्यांची अपेक्षा पूर्णपणें पुरी झाली नाहीं. पण त्यांच्या भिडस्त स्वभावामुळें त्यांनीं ती गोष्ट मनांतच ठेवली. व मनाचें असमाधान थोडेसें वाढविलें !

तात्यांच्या आईबापांशिवाय घरांत दुसरें वडील मनुष्य म्हणजे सखारामशास्त्री हे होते. त्यांचा सर्व मुलांवर लोभ असे. पण त्यांतहि त्यांचा मात्र तात्यांवर विशेष लोभ असे. त्यांना सर्व लहान मंडळी काका म्हणत. पण ते वडिलांप्रमाणेंच तात्यांना प्रिय होते. त्यांच्याजवळून जें शिकावयाचें तें तात्यांनीं शिकून घेतलें. कारखान्याला मूर्त स्वरूप देणारे जरी कृष्णशास्त्री व विष्णु तात्या हेच असले,

तरी कारखान्याच्या कल्पनेचे जनक सखारामशास्त्री असेंच तात्या मानीत. सखारामशास्त्री कोकणांतले राहणारे असून त्यांना वनस्पतींची व औषधिक्रियेची चांगली माहिती असे. कारखान्यांत तयार केलेल्या औषधांबद्दल, 'तीं सखाराम शास्त्री यांच्या विद्यमानें तयार झालीं आहेत,' असा 'आपल्या औषधें घेण्याची रीति,'नामक पुस्तकांत तात्या अभिमानपुरस्सर निर्वाळा देत. सखारामशास्त्री हे मोठे रुबाबदार गृहस्थ होते. त्यांचा पोषाख नेहमीं पेशवाई थाटाचा असे. पनवेलच्या पेठेंत सखारामशास्त्री यांचें सर्व जातींत सारखेंच वजन असे. पनवेल गांवांत घरोघरचे वैद्य तेच होते. त्यांना लोक पैसे देत व त्यांच्या घरीं अगत्यपूर्वक धान्य वगैरेहि पाठवीत. याप्रमाणें सखारामशास्त्री हे पुराणिकांचे एक पुरस्कर्तेच होते. त्या काळीं वैद्याला प्राप्ति झाली तरी ती बेताचीच असे. वैद्य, पुरोहित, व गुरुजी, हे उपकारकर्ते पुरुष आपल्या प्राप्तीनें श्रीमान झाले, असें कधींच घडत नसे. घेणाराचा अल्पसंतोष पाहून देणारांनीं आपला हात अधिकच आंखडता घ्यावा, अशी ही विलक्षण जनरीत आहे! मुंबईसारख्या शहरांतील आजचे नामांकित शस्त्रवैद्य एका शस्त्रक्रियेंत जे पैसे मिळवितात, ते पैसे उभ्या वर्षांत पूर्वीच्या नामांकित वैद्यांसहि मिळत नसत. शस्त्रक्रियेवांचूनहि पुष्कळ वेळां तेंच कार्य ते औषधयोजनेनें करीत. आज मागणारे बेगुमानपणानें मागतात व देणारे झकत देतात. मागण्यांत धैर्य असतें. अल्पसंतोषांत नव्हे. असें मानण्याचा आजचा धर्महीन काळ आला आहे! असो. तात्पर्य, सखारामशास्त्री यांनीं पैसा फार मिळविला नाहीं व विशेष द्रव्यसंग्रह केला नाहीं. बायको मुलें वगैरे कसलाच परिवार त्यांचेजवळ नव्हता. यामुळें ते पुराणिकांच्या घराण्यालाच अखेरपर्यंत चिकटून राहिले. सखारामशास्त्री जाऊन आज पसतीस वर्षें होऊन गेलीं. पण अजूनहि जुनीं माणसें त्यांचें नांव काढतात. सज्जनांची कीर्ति अजरामर राहाते.

अगदीं शिष्टाचाराप्रमाणें म्हटलें तरी मातृदेव, पितृदेव, आचार्यदेव, बंधु मित्र, कलत्र आणि सेवक असाच संबंधी जनांत अनुक्रम लागतो. तात्यांना तीन बंधु होते. तात्यांच्या पाठचे गदाधर ऊर्फ रावजी यांचा जन्म ता. २९ नवंबर सन १८७२ रोजीं झाला. यांचें शिक्षण मराठी चार पांच यत्ता व इंग्रजी एक दोन बुकें इतकें झाल्यावर ते घरींच थोडेंसें संस्कृत व वैद्यकी चिंतामणशास्त्री खरे यांचेजवळ शिकले. त्यांना नागोठाण्याचे रहिवासी व तेथील शाळेचे हेडमास्तर कानेटकर यांची मुलगी केली होती. गदाधर रावजी हे सात्विक वृत्तीचे व एकदेशी स्वभावाचे सज्जन पुरुष होते, पण भोळसट नव्हते. त्यांचें वागणें निरालस वृत्तीचें असे. त्यांची स्वच्छता व टापटीप प्रशंसनीय असे. ते रोज सांजसकाळ स्नान करीत असत. स्वभाव अगदीं साधा व सरळ असे. पण ते तितकेच करारी वृत्तीचे असत. घरांत कांहीं कारणानें बोलणें चालणें झाल्यावरून त्यांनीं गादीवर निजणें कायमचें सोडलें. कारखान्यांत काम करतांना खडें कामच केलें पाहिजे. आळसतां कामां नये. अशी तात्यांची कडक लष्करी शिस्त असे. त्यांच्या कारखान्यांत कोच, आरामखुर्च्या या तर नव्हत्याच, पण साध्याहि खुर्च्या नसत. स्टुलें व बांक असत. एकदां गदाधर रावजींचें स्टूल कोणा पाहुण्याला बसण्यासाठीं नेलें. तेव्हांपासून गदाधर रावजींनीं स्टुलावर किंवा बांकावरहि बसण्याचें वर्ज केलें! ते तासचेतास उभ्यानेंच कारखान्यांतील पत्र-व्यवहाराचें काम कारकुनांकडून करवून घेत व स्वतःहि करीत. दुसऱ्यानें वापरलेली वस्तु मग तें स्टूल का असेना, तें आपण वापरणें प्रशस्त नव्हे, इतकी त्यांची स्वच्छतेची आवड पराकाष्ठेची असे. ते अंमळ रागीट होते. पण तामसी असें निंदाव्यंजक विशेषण त्यांना लावतां येणार नाहीं. कारण त्यांनीं वडिलांचा, वडील बंधूंचा



तात्यासाहेब—गदाधररावजी—बापूराव—रामभाऊ.

सहकुटुंब चौघे बंधु.

[ पृ. १७५

किंवा दुसऱ्या कोणाचाच कधीं उपमर्द केला नाहीं. त्यांचा स्वभाव थोडा कायदेशीर व शिस्तीचा भोक्ता असे. कारखान्याच्या पत्र-व्यवहाराचे कामीं तात्यांना त्यांची थोडथोडी मदत सन १९०० सालापासून होऊं लागली होती.

गदाधर रावजी यांच्याहून धाकटे दुसरे बंधु पुरुषोत्तम ऊर्फ बापुराव होत. यांचा जन्म तारीख २३ मार्च १८८१ रोजीं झाला. यांचेंहि शिक्षण मराठी चार पांच इयत्ता व थोडी वैद्यकी इतकेंच पनवेलीस झालें. वैद्यकींत यांची गति थोडी बरी दिसल्यामुळें त्यांस वैद्यकीचें शिक्षण पुरें करण्याकरितां मुंबईस पोपट प्रभुराम यांच्या आयुर्वेदीय विद्यालयांत घातलें होतें. तेथील शिक्षणक्रम पुरा करून त्यांनीं मुंबईतच राहण्याचें ठरविलें. कारखान्याचें मुंबईत दुकान व दवाखाना भुलेश्वरीं कबुतरखान्याजवळ आहे. त्यावर त्यांची नेमणूक असे. बापुरावांचें मुंबई शहरांत बरेंच राहाणें झाल्यामुळें त्यांच्या वागणुकींत चतुरस्रपणा व गोडपणा अधिक आला होता. सर्व बंधूंत तात्यांचें बापूंवर प्रेम अधिक असे. याचें कारण एकच. तें हें कीं त्यांच्या ध्येयरूप श्रीधूतपापेश्वर मंदिराची सेवा सर्वांत बापूरावांकडूनच चांगली होईल, अशी त्यांना आशा होती. शिवाय तात्यांचा मुंबईचा मुख्य आधार दत्तोपंत सांडू, तो कधीं तरी लवकरच सुटणार, अशीं त्यांना चिन्हें दिसत असल्यामुळें, वाढत्या मुंबईत आपला घरचा मनुष्य असणें त्यांना फार जरूर वाटत होतें. बापूराव तेंच काम पहाणार होते. ते गदाधर रावजींहून नऊ वर्षांनीं लहान होते. त्यांना वसईचे बाळकृष्णपंत दादा कर्पे यांची मुलगी दिली होती.

तात्यांचे चवथे व सर्व भावंडांत धाकटे बंधु रामभाऊ. ह्यांचें जन्म सन १८८३ सालीं झालें. यांचेंहि शिक्षण वरील प्रमाणें मराठी पांच इयत्तांपर्यंत झालें होतें. व त्यानंतर कारखान्याच्या वैद्यक शाळेंत ते

थोडी वैद्यकीहि शिकले होते. पनवेलींत जास्त शिक्षणाची सोयच नव्हती. आणि परगांवीं मुलांस शिक्षणासाठीं पाठविणें हें सर्वांनाच सांपत्तिक दृष्टीनें शक्य व सोयीचें वाटत नसे. शिवाय रामभाऊ हे सर्वांत लहान असल्यामुळें आईबापांचें त्यांच्यावर प्रेम अधिक असे. त्यामुळें सर्व भावंडांत तेच हूड असत. आईबाप आणि तिघे उद्योगशील वडील बंधु इतकें डोकीवर छत्र असतांना त्यांना चरितार्थाकरितां जास्त विद्या शिकविण्याची व शिकण्याची गरजच भासली नाहीं.त्यांच्या जन्मा-नंतर थोड्याच काळांनीं पुराणिकांना पुढें चांगले दिवस येणार, अशीं सुचिन्हें दिसून लागलीं. ते भाग्यवानच खरे. त्यांना लहानपणापासून कधींच कसली चिंता वाहण्याचें कारण पडलें नाहीं. त्यांच्या ह्या हूड स्वभावामुळें व स्वैर वृत्तीमुळें तात्यांना त्यांच्या स्वभावाची नेहमीं काळजीच वाटे. तथापि, आपली चरित्राची कथा जेथपर्यंत आली आहे, त्यावेळीं ते अल्पवयीच होते. ते अद्यापि कारखान्यांत काम करूं लागले नव्हते. त्यांना पळस्प्याचे दादासाहेब ओझे यांची नात ( मुलीची मुलगी ) दिली होती. बापुराव व रामभाऊ या दोघांचीं लग्नें चार पांच महिन्यांचे अंतरानें संवत् १९५४ ( सन १८९८।९९ ) सालीं झालीं, तात्यांना तीन बहिणी होत्या, त्यांचेपैकीं मोठी वेणुताई मुंबईस माहीमच्या नारायणराव पराडकर यांस दिली होती. दुसरी बाळूताई पळस्पेंकर मोघे यांचेकडे दिली होती व तिसरी मनुताई आत्मारामपंत खेर यांस दिली होती. त्यांचे चुलते लक्ष्मणराव खेर यांचें पनवेलीस दुकान होतें. आत्मारामपंत हे पुढें ग्रॅज्युएट होऊन कांहीं दिवस सरकारी हायस्कुलांत मास्तर व पुढें डेप्युटी इन्स्पेक्टर झाले. हल्लीं त्यांनीं पेनशन घेतलें असून ते अलिबागेजवळ कामलें गांवीं राहत असतात.

तात्यांच्या या तीन बहिणींशिवाय त्यांचे शेजारी व स्नेही ठाण्याचे सुप्रसिद्ध वकील माधवराव पंडित यांची बहिण दुर्गाताई आठल्ये हीहि त्यांची मानलेली बहीण होती. खऱ्या बहिणी आपआपल्या घरीं असत. पण दुर्गाताई ही बालविधवा असल्यामुळें बहुधा पनवेलीस पुराणिकांचेच शेजारीं पंडितांचे घरीं राहात असे. यामुळें सख्या बहिणीपेक्षांहि तात्यांना ती जवळची झाली होती. व तात्यांचें व दुर्गाताईचें बंधुभगिनीप्रेम विशेष असे.

तात्यांचे मित्रांसंबंधीं वर्णन पूर्वीं आलेंच आहे. तात्यांचें कुटुंब यशोदाबाई ह्या चांदोरकर यांच्या घराण्यांतील हें मागें सांगितलेंच आहे. या प्रकृतीनें अशक्तच असत. पण थोरल्या सूनबाई यामुळें घरांत यांना काम मनस्वी पडे. घरीं बाई, ब्राह्मण, मोलकरणी ठेवण्याइतकी आरंभीं त्यांची स्थिति नव्हती. कुटुंब मोठें आणि त्यांत पुढें रोज कोणी आला गेलाहि असेच. यामुळें घरांतलें काम बरेंच असे. तो बोजा सहज झेंपण्याइतकी त्यांची प्रकृति निकोप नव्हती. पण बिनतक्रार व बिनबोभाट सारा दिवस काम करावयाचें, हें जुन्या पद्धतींतील कुटुंबांत सुशील सुनांचें व्रतच असे. सर्वांच्या अगोदर उठावें, सर्वांच्या मागून निजावें. सासू, सासरा, दीर, नणंदा, जावा, यांचे भिन्न स्वभावानुसार त्यांच्यासंबंधीं वागण्याचें धोरण ठेवावें. पतीची तब्येत राखावी, अशा विविध प्रकारच्या जबाबदाऱ्या गरीब कुटुंबवत्सल घराण्यांत विशेषेंकरून वडील सुनांवर पडतात. आणि त्या सर्व जबाबदाऱ्या त्या अत्यंत निरपेक्ष बुद्धीनें व निरालस वृत्तीनें बहुधा पार पाडतात. ही त्यांची तपश्चर्या खरोखरच वाखाणण्यासारखी असते. त्यांचें आत्मसंयमन, त्यांची तितिक्षा, त्यांचा कांटकपणा, अल्पसंतोष, त्यांची कर्तव्यतत्परता, हा एकेक गुण बहुमोलाचा असतो. त्याची खरी किंमत क्वचितच कोणाच्या लक्षांत येते !

आपल्या कुटुंबाला फार कष्ट पडतात, याची पुरी जाणीव तात्यांना असे. त्यांचें अंतःकरण त्यासाठीं तळमळे. पण प्रापंचिक परिस्थितीपुढें त्यांचा कांहींच इलाज चालत नसे. शिवाय या बायकांच्या जास्त कमी कामकाजाच्या व्यवहारांत पुरुषांनीं मन घातल्यानें घरांत धुसपुस वाढून अशांति उत्पन्न होते. त्यापेक्षां पडतील ते कष्ट सोसलेले पत्करले, अशीच जाणत्या कुलवधूंची भावना असल्यामुळें अशावेळीं पुरुषांनीं मूग खाऊनच बसणें शहाणपणाचें ठरतें. तात्यांच्या या बायकोला कांहीं मुलें झालीं. पण तीं फारशीं जगलीं नाहींत. एकच मुलगी बयो या नांवाची जगली होती. तात्यांच्या बायकोचे एक बंधु अनंतराव त्यांच्या कारखान्यांत नोकर होते. तात्यांच्या आतेबाईच्या मुलांपैकीं पळस्प्याचे त्र्यंबकशास्त्री धामणकर हे कारखान्याचे वैद्यक शाळेंतच शिकून वैद्य झाले. तात्यांचे मामा हरिभाऊ ओझे यांचीं मुलेंहि कारखान्यांत एकामागून एक नोकरीस लागलीं. तात्यांचे मराठी शाळेंतील मास्तर त्यांच्याच कारखान्यांत जमाखर्ची लिहिण्यावर होते. याशिवाय तात्यांच्या कारखान्यांतील जुनीं नोकर माणसें अल्प पगारावर इमानेंइतबारें कामें करीत होतीं. त्यांत सरदेसाई मास्तर, दशरथ सदाशिव साखरे, केशव विष्णु जोशी, मोरू पोवार, सखाराम गुरव अशीं कांहीं निवडक माणसें कामाला खंदी असून तात्यांचा त्यांच्यावर विशेष लोभ असे. त्याचप्रमाणें तात्यांचा आब्राहाम सुतार, देवळी कुंभारीण, महमद अली बोहरी, तसेंच आनंदराम इंद्रभानशेट मारवाडी ही ठरलेली सहाय्यक मंडळी असे. सर्वांवर त्यांची कामाची विशेष भिस्त असे. तात्यांचा कारखाना हेंच त्यांचें थोरलें कुटुंब होय. व त्या कारखान्याचे चालक म्हणून तात्यांवर प्रेम करणारे व त्यांस सहाय्यक होणारे हेच त्यांचे खरे कौटुंबिक होत. कारखा-

न्याचे द्वारा अनेक संबंधी जनांचें व कुटुंबांचें पोषण व्हावें, ही तात्यांची महत्त्वाकांक्षा असे.

**जीविते यस्य जीवन्ति दीना मित्राणि बान्धवाः ।**
**सफलं जीवितं तस्य आत्मार्थे को न जीवति ? ॥३१८॥प्र.सा.**

[ ज्याचें जीवित असल्यानें दीन, मित्र व बांधव जीवन करितात, त्याचेंच जीवन सफल आहे, कारण स्वतःसाठीं कोण जगत नाहीं ? ]





# प्रकरण १६ वें.

## विचारांचें काहूर.

असन्तोषः श्रियो मूलम् ।

[ असंतोष हें उत्कर्षाचें मूळ आहे. ]

तात्यांच्या एकंदर परिवाराशीं वाचकांचा अल्प परिचय मागील प्रकरणांत करून दिला. या परिवाराचें स्वरूप जितकें साधें सौम्य आहे, तसें तात्यांचें अभ्यंतराचें स्वरूप नव्हतें. त्यांच्या परिवारांत न्यून्यता नव्हती. पण त्यांच्या अंतःकरणांत बिलकुल स्वास्थ्य नव्हतें. तात्यांच्या बाह्य स्वरूपापेक्षां त्यांचें अंतःस्वरूप फार मोठें होतें. ते बाह्यतः बहुधा शांत दिसत. पण त्यांच्या मस्तकांत एषणांचें तुफान सुरू असे. त्यांच्या डोक्यांत विचारांचें काहूर इतकें माजलेलें असे कीं, त्यांत त्यांचें मस्तक थंड ठेवण्याकरितां डोकीवर एकेक दोन दोन बोटें जाड असा उपळसरी व चंदनाचा ओला लेप घालावा लागे. त्यांचे विचार त्यांच्या मस्तकांत सामावत नव्हते. त्यामुळें कीं काय ते आपले विचार पत्रद्वारां व तोंडीहि अनेकांजवळ प्रगट करीत.

त्यांच्या महत्त्वाकांक्षांना पंख फुटून त्या उडून जाऊं पहात, पण परिस्थितीच्या पिंजऱ्यांतून बाहेर पडणें, त्यांना शक्य नव्हतें. यामुळें त्यांच्या पंखांचे उत्तरोत्तर जास्त जोरानें आघात होऊं लागले. श्रीधूतपापेश्वर आरोग्य मंदिराची ख्याति हिंदुस्थानांतच काय, पण हिंदुस्थानच्या बाहेर परदेशांतहि गेली पाहिजे, आणि पनवेलच्या कारखान्यांतील औषधें चारी खंडांत विकलीं गेलीं पाहिजेत, अशी त्यांची प्रचंड लोकेषणा होती. मग ज्याप्रमाणें सामीप्य, सालोक्य, अथवा सारूप्य मुक्ति प्राप्त होण्यासाठीं तत्पूर्वी साधक इष्ट प्रतीकाचेंच ध्यान करितो, त्याप्रमाणें त्यांच्या ह्या उज्ज्वल लोकेषणेची मानसोपासना करण्याकरितांच कीं काय त्यांनीं दत्तोपंत सांडूना लिहून यूरोप खंडाचे नकाशे मागविले होते. दत्तोपंत, गुर्जर व गोडबोले, यांचे एजन्सीचे धागेदोरे बृहन्महाराष्ट्रांत पसरतच होते. त्याच मार्गानें तात्यांची महत्त्वाकांक्षा संचार करीत होती. त्यानंतर त्यांना मुंबईचे आर. हर्डीकर या दुकानचे मालक सारमंडलीक हे भेटले. नोकरीच्या संबंधानें त्यांना ग्वाल्हेर, झांशी वगैरे शहरींहि जाणें पडे. यामुळें त्यांच्या माहितीनें आपल्याला कारखान्यांतील औषधांची विक्री करणारे एजंट तिकडेहि पाहतां येतील, अशीं संधानें ते बांधीत होते.

श्रीधूतपापेश्वर मंदिराचें एजन्सीचें जाळें साऱ्या महाराष्ट्रांत, मग साऱ्या हिंदुस्थानांत आणि त्यानंतर हळूं हळूं परदेशांतहि पसरावें, अशी त्यांची एषणा होती. पण हें आयुर्वेदिक औषधांचा प्रसार करण्याचें काम करणारे मेहनती, व्यवस्थित, व प्रामाणिक एजंट कसे मिळवावे, हा मोठाच प्रश्न होता. मोठ्या व्यापाच्या कार्यकर्त्या माणसाला सहाय्यकारी लायक माणसांचीच अगोदर गरज भासते. एषणेच्या सिद्धींतील हा पहिलाच

मोठा परस्वाधीनपणा बराच त्रासदायक होतो. विशेषेंकरून आपल्या दक्षिणी लोकांत व्यापाराचें वळण नाहीं. गुजराथी, मारवाडी, बोहरी या जातींतील मुलांना दुकानदारीचें वळण बालपणापासूनच लागतें. दूरच्या मालकाचें काम नेकीनें व मेहनतीनें करावें, व त्याचा हिशेब चोख ठेवावा, हें सारें त्यांच्या अंगवळणीं पडलेलें असतें. दक्षिणी मंडळी खायला नाहीं तर अर्धपोटी राहातील; पण अल्पारंभानें व्यापारांत पै पैसा कसा जोडीत जावा, हें धोरण व ही उद्योगशीलता त्यांच्या ठिकाणीं आढळत नाहीं. याला निरालसवृत्ति, अंग मोडून काम करण्याची हौस, पैसापैसा जोडून सावकाशीनें सधन होण्याचा धीर, काटकसर, हिशेबीपणा, नेकी, रसवंती वाणी, आणि शांत व धिम्मा स्वभाव, असे अनेक गुण लागतात. पण या गुणांचीं माणसें फारशीं आढळत नाहींत. आणि दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, ज्या थोड्या जातींत अशा प्रकारचे अनुवंशिक संस्कार जन्मसिद्धच येतात, त्याहि जातींतील ते संस्कार आधुनिक शिक्षणपद्धतीनें कमी होत आहेत ! तात्यांना आरंभीं अशीं गैदू व नालायक माणसेंच ठिकठिकाणीं आढळलीं. औषधें विक्रीला न्यावीं, पण त्यांची विक्री करण्याची विशेष कांहींच खटपट करूं नये. त्यांतून खटपट न करितां जीं औषधें विकलीं जातील त्यांचे आलेले पैसे खाऊन टाकावे. मग औषधांचा व विक्रीचा हिशोबच देण्याचें टाळावें, पत्रांचीं उत्तरेंच पाठवूं नये, असे कटु अनुभव त्यांस येत गेले. त्यामुळें आरंभीं त्यांची जी नुकसानी झाली, ती सोसण्याचें त्यांस त्यावेळीं सामर्थ्य नव्हतें. यामुळें यास काय करावें, हा मोठाच विचार होता.

तात्यांचे त्या वेळचे सर्वांत मोठे एजंट म्हणजे मुंबईचे सांडू. ते जसे त्यांचे विक्रीचे एजंट होते, तसेच ते त्यांचे सल्लागार स्नेहीहि होते. हीं दोन्ही नातीं एकदमंच सुरूं झालीं. पण व्यवहारांतील सडेतोड-

पणाला मैत्रीची भीड जाचक होते. आणिं उलट व्यवहारांतील परस्परांचा स्वार्थ मैत्रींत विरोध उत्पन्न करतो; असाच जगाचा फार करून अनुभव आहे. तात्यांनीं आपला स्वार्थ श्रीधूतपापेश्वराच्या स्वाधीन केला होता. त्यामुळें त्यांच्या स्वार्थाला जरी परमार्थाचें स्वरूप प्राप्त होऊं पहात होतें, तरी त्याचें महत्त्व त्यांना. इतरांनीं आपल्या स्वार्थावर पाणी सोडून त्यांच्या भावनेची पूजा काय म्हणून करावी ? असा व्यवहारिक प्रश्न होता. या प्रश्नाची एक बाजू व्यावहारिक व दुसरी भावनाप्रधान अशी होती. ह्या दोन्ही बाजूंनीं तात्यांच्या मनावर फार जोराचे आघात होऊं लागले.

एजंटाचे कमिशनसंबंधीं व इतर सवलतीचे हक्क व त्याच्या जबाबदाऱ्या अथवा शर्ती हा फार गुंतागुंतीचा व मतभेद उत्पन्न करणारा वाद आरंभींच सुरू झाला. विशेष भांडवल नसतां नवीन धंदा वाढीस लावावयाचा, म्हणजे दुसऱ्यांना आरंभीं जास्त सवलती द्याव्या लागतात. पण पुढें त्या सवलती सरसहा सर्वांनाच देणें अशक्य झाल्यामुळें त्या मर्यादित करणें भाग पडतें, अशा वेळीं द्वैत उत्पन्न होतें.

. एजन्सीचे व्यवहारामध्यें सोल एजन्सी हें एक मोठें आमीष असतें. पण त्यांत उभयपक्षीं द्रव्यलोभानें वादाचे अनेक प्रश्न उत्पन्न होतात. व्यापारंच म्हटला कीं तेथें वित्तेषणा ही आलीच. पण ती कलीं उत्पन्न करते. आरंभीं सोल एजन्सीचें आमीष दाखवून सोल एजन्सी जमवावी लागते. पण त्या एजन्टला नफा मिळूं लागला, म्हणजे लाभाचे आशेनें दुसरे लोक चुरशीनें पुढें येतात व सोल एजंटपेक्षां कमी सवलतीनें ते कारखानदाराकडे माल मागूं लागतात. फार काय पण वस्त्रखान्यांतून किंवा इतर एजंटांकडून कमिशन कमून रोखीनेंहि ते माल नेतात, व आपलीं दुकानें उघडतात. रोखीनें घाऊक माल घेणारा ग्राहक कारखान्याला उधारी माल नेणाऱ्या एजंटापेक्षांहि

सोयीचा होतो. उलट त्यांनीं तो माल नेऊन कोठें कसा विकावा अगर विकूं नये, असें कोणतेंच नियंत्रण त्यांच्यावर घालतां येत नाहीं. यामुळें सोल एजंटाच्या इभ्रतीला व नफ्याला थोडा फार कमीपणा येतो. सोल एजंट यास आपल्या जोखमावर पोट एजन्सी काढाव्या लागतात व इतरहि खटपटी व प्रसिद्धीसंबंधीं खर्च करावे लागतात, हें खरें. पण कोणीहि सोल एजंट मालाच्या विक्रीसाठीं शक्य त्या सर्व खटपटी करीत आहे, हें ठरविण्याला निश्चित साधन कांहींच नसतें. उलट त्याच्या खटपटीच्या भरवंशावर कारखानदार मात्र सोल एजंट यास तोडून दिलेले प्रांतांत दुसरी एजन्सी देऊं शकत नाहीं. शिवाय कारखान्यांतून जे औषधें नेत, त्या ग्राहकांस औषधांच्या किंमतींत वैद्यकीय सल्ल्यासह औषधें मिळत. ती सोय सोल एजंटनें आपल्या दुकानीं ठेवली पाहिजे, असें तात्यांचें म्हणणें असे. दुसरा भानगडीचा प्रश्न पोट कमिशनचा असतो. एजन्ट कारखानदाराकडून जें कमिशन घेतात तें सर्व त्यांना पचवितां येत नाहीं. गिऱ्हाइकी राखण्याकरितां ते ग्राहकांना त्यांतलें कांहीं कमिशन किंमतींत बाद घालतात आणि या प्रमाणें कारखान्याचें विनाकारण नुकसान करितात.

तिसरा भानगडीचा प्रश्न एजंटांनीं एजन्सीच्या जातीचा दुसरा कोणाचा माल विकावा कीं नाहीं हा असतो. गिऱ्हाइकाला निरनिराळ्या कारखान्याचा माल पसंतीकरितां दाखवावा लागतो. यामुळें एकाच कारखान्यांतला माल आणून त्यावर दुकानदारी करणें त्यास सोयीचें नसतें. ग्राहकांच्या आवडनिवडीप्रमाणें त्यांस घेतां यावा, ग्राहक दुसऱ्या दुकानीं जाऊं नये, यासाठीं निरनिराळ्या कारखान्यांतील एकाच जातीचा माल त्यास ठेवावा लागतो. अर्थात्‌ तो केवळ कमिशनचाच मालक असल्यामुळें ज्या कारखान्यांत जास्त कमिशन मिळतें, तोच माल खपविण्याचा थोडा फार प्रयत्न करतो. शिवाय

एजन्टाला अशी परवानगी असली म्हणजे तो हळुहळू शक्य असतें तेथें आपला घरचाच माल बनवूं लागतो आणि कारखानदाराच्या इभ्रतीवर मिळविलेल्या गिऱ्हाइकींत तोच आपल्या मालाची जास्त खातरजमा देऊन तो खपवितो व कारखान्याचें नुकसान करितो. अशा रीतीनें हळुहळू एजंटच कारखान्याशीं स्पर्धा करणारे घरचेच शत्रु बनतात.

तारीख २३ डिसेंबर सन १८९९ चे पत्रांत तात्या लिहितात, "ज्या पूज्य श्रींपदीं कारखान्याचें स्वामित्व अर्पण झालें. औषधी-संबंधीं हरएक घरगुती बाबींकडे दुर्लक्ष केलें. प्रपंचभार न घेतां श्रींच्या ( श्री धूतपापेश्वराच्या ) कारखान्याचें रक्षण–वाढ हेंच कर्म, धर्म व मोक्ष मानून सेवा सुरूं आहे, त्याच्या मनांत आपल्या एजंटांनीं-मित्रांनींहि–तसेंच वागावें असें कां नसावें ? +++ एजंटाकडे श्रींच्या कारखान्यांतील औषधें मागण्यास येतात, त्यांना एजंटानेंच तयार केलेलें औषध दिसावेंना ? यापासून पुढें काय काय गोष्टी घडत जाणार ? एक औषध तयार झालें, दुसरें होईल, तिसरें घडेल. अशा प्रकारें लोकांना भ्रमांत पाडणारें कर्म एजंटांनीं करण्याचें मनांत आणलें तरी कसें ? वरील प्रकार जो एजंट आरंभणार तोच जर पनवेलच्या पुराणिक ह्यांनीं आरंभिला असतां तर आजला पुराणिकांच्या हवेल्या, कोठारें बाग इ० खटलीं किती वाढलीं असतीं ? व या कारखान्याच्या इमारतींत सत्तर माणसांचीं अन्नें एकत्र झालीं असतीं काय ?"

हें पत्र बरेंच मोठें व तितकेंच महत्त्वाचें आहे. पण वरील लहानशा उताऱ्यांत तात्यांच्या मनांतील शल्य स्पष्ट दिसतें. मुख्य एजंटाची म्हणजे तात्यांची प्रतिकृतीच सोल एजंटानें करीत आलें पाहिजे. म्हणजे त्यांची कारखान्यांसंबंधीं निरतिशय हितबुद्धि आणि स्वतांसंबंधीं अत्यंत मर्यादित स्वार्थबुद्धि असली पाहिजे, असाच इसम सोल

एजंट होण्यास पात्र ठरेल, असें तात्यांचें म्हणणें वरील उताऱ्यांवरून स्पष्ट होतें. तसेंच कारखान्यासंबंधीं त्यांची निस्वार्थी धार्मिक भावनाहि स्पष्ट होते. तात्या आजवर जगते तर त्यांनीं आपल्या भावनेला मूर्तरूपांत कसें आणलें असतें, याचें अनुमान त्यांच्या लेखांवरूनहि बांधतां येणार नाहीं. तात्यांच्या या धार्मिक भावनेला कायदेशीर स्वरूप त्यांना हवें होतें तसें देतां येणें शक्यच नव्हतें. व कारखान्याच्या दृष्टीनें तें व्यवहारतः परिणामीं हिताचेंहि होणार नव्हतें. असाच सल्ला व्यवहारज्ञ कायदे पंडितांनी त्यांस दिल्यामुळें ते आपल्या भावनेप्रमाणेंच कारखान्यासंबंधीं जरी वागत राहिले, तरी त्यावरील आपली सत्ता त्यांनीं कायदेशीर रीतीनें कधींच सोडली नाहीं. यासंबंधीं कोणाचा गैर समज राहूं नये, म्हणून हा खुलासा येथें व पूर्वीं एका ठिकाणीं केला आहे. व पुढेंहि याचा जरूर तो खुलासा योग्य त्या स्थळीं होईल. असो.

आपण ज्या कालाचा यावेळीं विचार करीत आहों, त्यावेळीं एजन्सीच्यासंबंधानें अनेक वादग्रस्त व गुंतागुंतीचे प्रश्न तात्यांच्यापुढें होते. तात्यांच्या कारखान्याचा बस अद्याप बसावयाचा होता. त्यांना एजंट व ग्राहक यांस सवलती देऊन त्यांस जोडावयाचें होतें. म्हणूं त्या शर्ती दुसऱ्यावर लादण्याइतकें स्थाइकत्व व सामर्थ्य त्यांस आलेलें नव्हतें. त्यांत सांडू म्हणजे त्यांचे मोठेच पुरस्कर्ते होते. त्यांना न दुखवितां पुढें नडक होणार नाहींत, अशा एजन्सीच्या शर्ती त्यांस कबूल करण्यास कसें लावावें, हा फार नाज़ुक व महत्त्वाचा प्रश्न होता. सांडू व पुराणिक यांच्यामधील मध्यस्थ मंडळींचा ओढा सांडूकडे असे. यामुळें तात्यांचा जास्तच कोंडमारा झाला! उभयतांच्या दृष्टींत एक महत्त्वाचा फरक असे. तात्कालिक नफ्यातोट्याकडे इतर मध्यस्थ मंडळी पाहात. तात्यांचें धोरण फार पुढलें व व्यापक असे.

त्यांचें म्हणणें असें असे कीं पुढें ज्या वेळीं आयुर्वेदिक औषधांची मागणी देशांत फार वाढेल, त्यावेळीं या सोल एजन्सीची पद्धत कारखान्याला नडक होईल. त्यांचें कमिशन बेसुमार वाढत जाऊन त्या मानानें त्यांचा उपयोग कारखान्याला होणार नाहीं. सोल एजन्सीचीं स्वतंत्रच राज्येंच बनून तीं नियंत्रणांत ठेवणें कठीण जाईल. तसेंच आरंभीं गजकर्ण मलम, खरजेचें मलम, दंतमंजन, बाळकडू अशीं कांहीं किरकोळ औषधें एजंटानें केलीं, तरी तिकडे दुर्लक्ष्य करून चालणार नाहीं. त्याचप्रमाणें दुसऱ्या कोणाचीं त्याच जातीचीं चार औषधें विक्रीस ठेवण्यासहि परवानगी देणें सोयीचें नाहीं. कारण तीं चारच औषधें खपवितांना कारखान्याच्या औषधांपेक्षां तीं सरस आहेत, असें एजंटानें सांगण्यांत कारखान्यांतील सर्व औषधांबद्दल तो गैरसमज उत्पन्न करील.

तात्पर्य तात्यांचें म्हणणें असें होतें कीं, सांडूच्या कर्तृत्वाची व मदतीची पूर्ण जाणीव असूनहि एजन्सीचे नियम ठरवितांना ही व्यक्तिविषयक पक्षपात बुद्धि मनांत आणून चालणार नाहीं. दुसऱ्यांच्यासंबंधीं व पुढल्या धोरणानें ती नडक होईल. तात्या कारखान्याच्या हितापलीकडे कशासच महत्त्व देण्यास तयार नव्हते.

या विषयाचा येथें विस्तार करण्याचें कारण कारखान्याच्या इतिहासांत या विषयाला फार महत्त्व आहे. आणि त्याहिपेक्षां तात्यांच्या आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाचीं अशीं दहापंधरा वर्षे विशेषेंकरून याच विषयानें ग्रासलीं होतीं ! आतां या विषयाला ऐतिहासिक दृष्टीशिवाय महत्त्व उरलें नाहीं. आणि ऐतिहासिक दृष्टीनेंहि यांत सांडू अगर तात्या यांपैकीं कोण चुकत होते, याचीहि निरर्थक चिकित्सा वाढवून उतूं गेलेल्या कढीला पुन्हां कढ आणणेंहि अप्रस्तुतच आहे. कारण हा वाद सुरू होण्याचे पूर्वीं, तो वाद सुरू असतां व

त्यानंतरहि सांडू व पुराणिक यांचा घरोब्याचा संबंध कधींच तुटला नाहीं. मध्यंतरीं कांहीं काळ असा गेला कीं, ज्यावेळीं सांडूंच्या पुरस्काराची व मदतीची जाण तात्यांनीं ठेवली नाहीं, असें सांडू व त्यांचे पक्षपाती म्हणत होते, व सांडू स्वार्थनिरपेक्षतेंत माझी प्रतिकृति करण्यास चुकले, असें तात्या आपल्या मनाशीं धरून बसले होते. पण तो गैरसमजाचा काळ गेला. आणि आतां परिणामाकडे नजर देतां श्रीगुरुकृपेनें या वादांत कोणीच कोणाचें नुकसान न करितां आज दोन्हीहि घराणीं स्वतंत्रपणें, संपन्नपणें व सलोख्यानेंच नांदत आहेत, ही फार समाधानाची गोष्ट आहे. असो.

हा व्यक्तिविषयक भाग सोडून त्यावेळीं तात्यांपुढें किती भानगडीचे प्रश्न होते, त्यांचेंच येथें दिग्दर्शन करावयाचें आहे. तात्यांचा कारखाना शेअर होल्डर्सचा नव्हता. शेअर्स काढावें, धनिकांचें साह्य घ्यावें, असेहि विचार त्यांच्या मनांत वरचेवर येत होते. पण मुख्यत्वें-करून स्वावलंबनानें व स्वतांच्या मतीनें कारखाना चालविणाराला वरील दोन्ही कल्पना गैरसोयीच्याच होत्या. पण स्वावलंबनानें म्हणजे कारखान्याचें सारें उत्पन्न कारखान्यांतच घालून चक्रवाढीनें तो वाढवावा, तर कारखान्याचे उत्पन्नांतील अप्रत्यक्ष भागीदारांची संख्या व त्यांची भूक फारच वाढत चालली होती. ग्राहकांस कमिशन, वैद्यांना कमिशन, एजंटांना कमिशन, निरनिराळ्या औषधांवर अधिकाधिक कमिशन, एजंटाकडली बूड, बाटल्यांची फूटतूट, थकलेली उधारी, अशी नांवेकडील सदरें फारच वाढत होतीं.

पेटीवाला, तबलजी, टाळकरी यांतच सारी बिदागी विभागली जाऊन, हरिदासानें एवढें शिकून घसा कोरडा केला, त्याला कांहींच राहूं नये, अशी तात्यांच्या धूतपापेश्वर सेवेची शेवटीं वाट लागण्याची वेळ आली! जुन्या एजंटांना व धाऊक ग्राहकांना पंचवीस

तीस टक्के कमिशन द्यावयाचें; सोल एजन्टाला त्यावर आणखी कमिशन द्यावयाचें; मग मुख्य एजन्ट, प्रतिनिधी, चालक, यांस काय मिळावयाचें ? आणि अखेर विक्रीचे सारेच टक्के वाटले तर मग कारखान्याचें भांडवल वाढवून त्याची भरभराट कधीं व केव्हां व्हावयाची ? हा मोठा बिकट प्रश्न तात्यांपुढें होता. कारखान्याच्या भरभराटीसाठीं ते स्वतः वाटेल तितका स्वार्थत्याग करायला तयार होते. पण, ह्या त्यांच्या त्यागाच्या भावनेंतच तात्यांना सुख व आनंद वाटत असला, तरी त्यांच्या त्या सुखाच्या किंवा आनंदाच्या हौशी-साठीं इतरांनींहि आपला स्वार्थ सोडावा, ही गोष्ट त्यांच्या व्यावहारिक एजंटांना व तात्यांच्या घरच्या मंडळींनाहि सर्वस्वीं पटण्यासारखी नव्हती. वरची भावना आणि खालचा व्यवहार यांत अशी सारखी ओढाताण सुरूं असून ह्या ओढाताणींत हा भावनेचा पतंग तुटून जातो कीं काय अशीहि मोठी काळजी होती !

कर्तव्याची जाणीव व त्यागाची बुद्धि या परीक्षेंत जेथें त्यांच्या घरची मंडळी व घरोब्यांतील एजंटहि उतरले नाहींत, तेथें रोजमुऱ्यानें काम करणारे अशिक्षित व अडाणी गडी ते काय टिकणार ! एकदां कारखान्याच्या एका कोपऱ्यांतील केरांत कांहीं औषधें गेलीं आहेत, असे एका पाहुण्यानें तात्यांचे नजरेस आणलें. खरा प्रकार काय झाला असावा, तें तात्यांचे चटकन् लक्षांत आलें. खललेल्या औषधांच्या गोळ्या करण्यास बसविलेले कत्रांटी गडी कामास कंटाळून त्यांनीं खललेल्या औषधांपैकीं कांहीं भाग केरांत लोटून देऊन काम आटोपून ते मोकळे झाले असावेत, असें त्यांनीं ताडलें. तीं केरांत लोटलेलीं सूतशेखर वगैरे औषधें दोन अडीचशें रुपये किंमतीचीं होतीं. त्या गड्यांना त्यांची काय किंमत ? पण तात्यांना तें नुकसान त्यावेळीं जडभारीच होतें.

" तुम्ही आज कारखान्याचें फार मोठें काम केलेंत. " असें ते त्या पाहुण्यांना म्हणाले. आणि त्यांनीं त्या गड्यांना बोलवून घेतलें. आतां हे ह्या गड्यांना पुष्कळच बोलणार, असें त्या पाहुण्यास दिसतच होतें. पण तसें कांहींच घडलें नाहीं. ही वेळ रागावण्याची नाहीं. साऱ्या अडचणी, सारीं नुकसानें, सर्व मतभेद, समुद्र वडवानळाला पोटांत ठेवतो, त्याप्रमाणें गिळले पाहिजेत, हें ते जाणून होते. आज हे गडी हांकलून दिले तर कामाचे माहितगार गडी उद्यां पुन्हां मिळण्याची पंचाईत पडेल ! ह्या धोरणानें ते त्या गड्यांस शांतपणानें म्हणाले " अरे, तुम्ही कामाला कंटाळून हीं औषधें केरांत लोटून दिलींत. यांत कारखान्याचें दोन तीनशें रुपयांचें नुकसान केलेंत. याची तुम्हांला कल्पना आहे काय ? असें जर तुम्ही कारखान्याचें नुकसान होऊं द्याल, तर कारखाना कशावर चालेल ? तुम्हाला कामाचा कंटाळा आला तर तसें सांगावें ! तुमच्यावर काय कोणी कामाची गोण लादली होती ? जा, असें पुन्हां करूं नका." तात्यांचा ह्या युक्तिवादापेक्षां त्यांच्या शान्तीनेंच ते कामकरी अत्यंत खजील झाले. व अशा शांत व दयाळू धन्याचें आपण व्यर्थ नुकसान केलें ! पुन्हां असें पाप आपण करतां कामा नये, असा त्यांनीं धडा घेतला.

ही एक गोष्ट उदाहरणार्थ सांगितली. पण त्या बाल्यावस्थेंतील कारखान्यास, लहान मुलाच्या कुपथ्याप्रमाणें, तात्यांना डोळ्यांत तेल घालून जपावें लागे. लहान मुलाला थोडेसें कुपथ्यहि जसें सोसत नाहीं, त्याप्रमाणें त्यांच्या कारखान्याला निष्काळजीपणा किंवा खर्चिकपणा मुळींच खपण्यासारखा नव्हता. श्रीधूतपापेश्वर मंदिराच्या सेवकानें " मी या संस्थेच्या कामीं अफरातफर अगर लबाडी किंवा संस्थेचें प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष नुकसान करणार नाहीं. नोकर

लोकांच्या संबंधानें असलेले संस्थेचे नियम मला माहीत आहेत. ते मी पाळीन," असा श्रीधूतपापेश्वराची शपथपूर्वक करार करावा, असें संस्थेच्या व्यवस्थापत्राच्या मसुद्यांत लिहिलेलें आहे. पण जोंवर कारखाना माणसांसंबंधीं गरजू होता, तोंवर अशा शर्ती कागदोपत्रींच रहावयाच्या, हेंहि उघडच होतें. तात्पर्य, कारखान्यावरील देखरेख व संरक्षण यासंबंधींचे विचार तात्यांचे मनांत अक्षय्य जागतेच होते. कामकऱ्यांना सहस्रपुटी अभ्रक आणि कपर्दिभस्म, हेमगर्भ आणि लसूणवटिका, यांची किंमत सारखीच होती. यामुळें औषधांचा नास व चोरी होऊं नये, तयार औषधांचा हिशेबी मेळ असावा, यासाठीं दक्षतेची फारच मोठी जबाबदारी तात्यांच्यावर होती.

गड्यांना गरजेचे वेळीं लग्नकारणाला वगैरे पैसे देऊन खूष ठेवावयाचें व त्यांच्याकडून वेळीं अवेळीं भरपूर काम करून घ्यावयाचें असें तात्यांचें कामकऱ्यांशीं वर्तन असे. अशा वेळीं गड्यांना संभाळून न घेतलें तर त्यांच्या अंगावर दिलेले पैसेहि जावयाचे हें धोरण त्यांना संभाळावें लागे.

ही अगदीं खालच्या वर्गाच्या कामकऱ्यांची गोष्ट झाली. त्याचप्रमाणें, पनवेलच्या श्रीधूतपापेश्वर मंदिरांतील प्रतिनिधी, चालक व मुख्य एजंट या तीन प्रमुख अधिकाऱ्यांचें गुणवैशिष्ट्य काय असावें, तसेंच त्यांच्या अधिकाराच्या व कार्याच्या मर्यादा कोणत्या असावा, हे प्रश्न जसे मूलग्राही महत्त्वाचे तसेच नाजुक होते. कारण या तिन्ही अधिकारांवर घरचीच मंडळी होती. सर्व योजनेचे सूत्रधार तात्याच व अधिकारविभागणींत एका बाजूस वडील व दुसरे बाजूस धाकटे बंधु असा प्रकार होता. यांत शिस्त घालून देणें हें काम बरेंच विचाराचें व नाजूक होतें. तसेंच प्रतिनिधी, मुख्य एजंट व चालक या त्रयींतील चालक हा वंशपरंपरेंतील नसावा, शिष्यपरंपरेंतील असावा,

असें ठरवितांना तात्यांनीं अनुवंशिक शिक्षणपरंपरा नष्ट होत आहे, वैद्याचे मुलानें वास्तविक वैद्यकीच शिकावी, पण तसें न होतां जो तो इंग्रजीमागें धांवतो, ही अनिष्ट परिस्थिति लक्षांत घेऊनच पुराणिक घराण्याच्या हितसंबंधापेक्षां कार्यावर नजर ठेवून शिष्यपरंपरेंतूनच तज्ज्ञ असा चालक निवडावा, असें ठरविलें. त्यांत घरच्या मंडळीची थोडी फार नामर्जीच त्यांना पत्करावी लागली असेल.

वरीलप्रमाणें चालकाची निवडणूक ठरवितांना तो अगदींच तिऱ्हाईत न नेमतां तो श्रीधूतपापेश्वर मंदिर संस्थेचा ऋणी व हित-चिंतक असावा या धोरणानें तो कारखान्याच्या आयुर्वेद शाळेंत तयार झालेला असावा, असेंही त्यांनीं ठरविलें. आणि या सर्व योजनांत कारखान्यास वैद्यक शाळेची जोड देण्यांत त्यांनीं आजच्या पुस्तकी शिक्षणक्रमांत असलेलें एक मोठेंच वैगुण्य दूर केलें. तात्या एका पत्रांत म्हणतात—" कारखाना व नजीक वैद्यक शाळा अस-ल्यानें उभय कामें अबाधित सुयंत्रित, चालतील. कारखाना अविनाशी, विद्वान् आणि धार्मिक गुरु, बुद्धिमान आणि स्थिर बुद्धीचे शिष्य, अशी त्रयी जुळेल तर फारच उत्तम होणार आहे."

आयुर्वेद शाळा उघडण्याच्या पूर्वीचे त्यांचे हे विचार आहेत. पुढें ती शाळा उघडल्यावर इतर ठिकाणांप्रमाणें पनवेल येथें प्लेगनें धुमाकूळ सुरू केला ! त्यामुळें विद्यार्थ्यांच्या सुरक्षिततेचें फारच मोठें जोखम वाढलें व गांवांत दरसाल प्लेगची धाड येत असतां शाळा कशी चालवावी हा मोठाच विचार येऊन पडला. शिवाय, कारखाना आणि शाळा एकत्र जोडल्यानें पुढेंमागें कारखान्याला घरच्या प्रमा-णेंच अगत्याच्या चांगल्या माणसांची जोड व शाळेला कारखान्याची सांपत्तिक व अनुभविक ज्ञानाची मदत, असा सुंदर मिलाफ झाला खरा; पण कारखाना सांपत्तिक दृष्ट्या तितका समृद्ध नसल्यामुळें

बाहेरची आर्थिक मदत कोणच्या स्वरूपांत कशी जमवावी, हाहि एक स्वतंत्र विचार त्यांच्या पुढें नित्याचाच होता.

तात्यांच्या महत्त्वाकांक्षेप्रमाणें एजन्सीचें जाळें चोहोंकडे पसरावयाचें म्हणजे शेंकडों एजंटांकडे हजारों रुपयांचा तयार माल उधारीनें पाठवावा लागणार. याशिवाय कॉलरा, प्लेग अशा सांथीच्या रोगांवर धर्मार्थ देण्याकरितां जेवढा औषधी माल तयार ठेवावा तेवढा थोडाच असें होतें. एवढ्या प्रचंड खटाटोपास निदान एक लाख रुपये तरी भांडवल पाहिजे होतें. पण तात्यांना भांडवलाची प्रथम पासूनच वाण होती. एजंट व नोकर यांचेकडून अमानत रकमा घेऊन त्या आपल्याकडे व्याजी ठेवाव्या, अशी त्यांची योजना होती. पण अशानें पुरेसें भांडवल फिरतें राहाणें शक्य नव्हतें. शिवाय गंगाजळी म्हणून कांहीं रक्कम बाजूला ठेवावी, हाहि विचार मूर्त स्वरूपांत कसा आणावा हा विचारच होता. द्रव्याचा संकोच हा तात्यांच्या महत्त्वाकांक्षेस मोठाच पायबंद होता. महत्त्वाकांक्षा आपल्या कल्पनेच्या पंखानें भुर्रकन् वाटेल तितकी उंच उडून जाई, पण लोकेषणा आणि वित्तेषणा यांचें वजनच मंदगतिकारक होतें.

कुंभेच्या मेळ्यांत धटिंगणांचे तुफान गर्दींत ज्याप्रमाणें कांहीं स्त्रियाहि सांपडाव्या, त्याप्रमाणें तात्यांच्या लौकिक आणि आर्थिक अशा कठोर विचारांच्या धुमश्चक्रींत त्या वेळीं कांहीं कोमल एषणाहि चिरडल्या जाऊं लागल्या ! या एषणा म्हणजे दारेषणा व पुत्रेषणा या होत.

महत्त्वाकांक्षी पुरुषांच्या लोकेषणा व वित्तेषणा यांचे मागोमाग व्यावहारिक दृष्टीनें प्रेमाचा वारसा बायकोकडेच अगोदर येतो. गृहिणी हीच गृहाची शोभा होय. स्त्रीजातीकडूनच जीवाचा जन्म असल्यामुळें व स्त्रीच्याच स्तन्यावर आरंभीं कांहीं महिने तो जगला असल्यामुळें

जीवमात्रास स्त्रीचा जिव्हाळा स्वाभाविकच वाटतो. प्रत्येक जीवासाठीं प्रथम कोणी निरपेक्ष कष्ट सहन केले असले, तर ती स्त्री होय. एका स्त्रीचे पोटीं जन्मास आलेला जीव पुन्हां स्त्रीच्या ठिकाणीं अपत्य रूपानें जन्मास येऊन आपले स्त्रीविषयक प्रेमाचें वर्तुळ पुरें करीत असावा. तसेंच प्रत्येक स्त्री पुरुषापासून जन्म पावून पुन्हां पुरुषापासून आपल्याच ठिकाणीं अपत्य रूपानें जन्मास येण्याची इच्छा करीत असावी. ही निसर्गाची सामान्यच प्रेरणा दिसते. त्यांत जगाचा व्यवहार पाहतां असें दिसतें कीं, अत्यंत कर्तृत्ववान् माणसांना त्यांच्या कर्तृत्वाच्या मानानें निरपेक्ष आणि निरतिशय अशा स्त्रीप्रेमाची अत्यंत गरज भासते. कर्तृत्ववान् माणसांना जगांत स्तावक, निंदक आणि उदासीन अशी त्रिविधता लोकांत आढळते. हे तिन्ही वर्ग थोडेफार स्वार्थ बुद्धीनेंच प्रेरित असतात. स्तुतिपाठक स्वार्थी असतात, निंदक आपल्या मात्सर्यानें आपला स्वार्थच उघड करितात, आणि उदासीन वर्गाची बेपर्वा जो तो आपआपल्या स्वार्थांत गुंतला आहे, हेंच दर्शविते. महत्त्वाकांक्षी व कर्तृत्ववान् पुरुषाला हें कळून येतें. मग तो जगाच्या स्तुतीची व निंदेची पर्वा करीत नाहींसा होतो. पण त्याच्या अंतरात्म्याला शुद्ध निरपेक्ष प्रेमाची भूक असते. ती भूक भागविण्याचें सामर्थ्य व्यवहारांत स्त्री इतकें ईश्वरानें कोणांतच ठेवलेलें नाहीं.

शिवाय असें कीं क्रियेची प्रतिक्रिया हा सृष्टीचा अबाधित नियम आहे. क्रूर शौर्याला, कठोर कर्तव्य किंवा कर्तृत्वबुद्धीला, साहस आणि कष्ट करणाऱ्या माणसांना, तीव्र देहबुद्धीनें केलेल्या या व्यवसायांचा केव्हां तरी शीण येतो. आणि म्हणून हें देहभान क्षणभर नाहींसें करील, कमी करील, हलकें करील, अशी स्त्रीप्रेमाची निशा त्यांना हवी असते. हा देहधर्म आहे. हा मनोधर्म आहे. भारतीवीर पार्थ,

पृथ्वीराज चव्हाण, शिवछत्रपति, संभाजी, पहिले बाजीराव, महादजी शिंदे, नेपोलिअन बोनापार्ट, ड्यूक ऑफ वेलिंगटन्, हे महानयोद्धे स्त्रीप्रेमासाठीं आशक बनत असें दिसतें ! ज्याला अनुकूल स्त्री मिळत नाहीं, तो मातृप्रेमांत किंवा भगिनीप्रेमांत सुख मानून घेतो. ज्यांस तेंहि लाभत नाहीं, ते स्त्रीप्रेमाची तलफ निशेंत भागवितात ! पण साधनांचे अटोकाट कष्ट उठविणारे परमार्थ–साधक ज्याप्रमाणें **'देहभाव हारपला । तुज पाहतां विठ्ठला'** असे धन्योद्गार काढीत आत्मानंदांत मग्न होतात, त्याप्रमाणें त्या आत्मानंदाची किंचित् छाया दाखविणारें जें स्त्रीविषयक सुख त्या सुखासाठीं कर्मवीरांचें मन लाचावलेलें असतें. त्याचप्रमाणें केवळ विलासिनींनांच नव्हे तर कष्ट करणाऱ्या सुशील हिंदु कुलवधूला सुद्धां, ' दिवसभर काम करून दमलीस बरं ! ' असें म्हणून पाठीवरून प्रेमाचा हात फिरविणाऱ्या पतींची टूक लागते.

पतिपत्नी प्रेम हा पडद्याआडचा विषय आहे. तो काल्पनिक कादंबरीकार व नाटककार यांशिवाय कोणाच तिऱ्हाइताला लिहितां येणें शक्य नसतें. यामुळें कोणत्याहि चरित्रांत त्याचें यथास्थित वर्णन करतां येत नाहीं. तथापि माझें असें अनुमान आहे कीं, तात्यांना अशा निरपेक्ष स्त्रीप्रेमाची गरज वाटत असावी.

त्याचप्रमाणें पुत्रेषणा ही पण तात्यांच्या हृदयांतील एका आंतील कप्प्याला एकसारखी लागलेली ओढ होती. बाकीच्या सर्व एषणांचा लोक अनुभव घेत असले तरी आज संततिनियमनाच्या कालांत पुत्रेषणेच्या निकडीचा अनुभव घेणारे फारच विरळा असावेत. सन १८९८ सालीं तात्यांचें लग्न होऊन पंधरा वर्षें झालीं होतीं. या मुदतींत त्यांना अनेक अपत्यें झालीं. त्यांत एक मुलगाहि झाला. पण तो फार दिवस जगला नाहीं. बायको फार अशक्त व तिला जीं

मुलें झालीं, त्यांत एकच अपवाद सोडून साऱ्या मुलीच होत्या. त्यांच्या ध्येयरूप कारखान्याचा भावी कर्णधार त्यांना त्यांच्या नजरेखालीं तयार करावयाचा होता. अर्थात्, तो आपल्याच पोटीं जन्मास यावा, अशी त्यांची स्वाभाविकच उत्कट इच्छा होती. त्यांना कनिष्ठ बंधु होते. पण त्यांच्या ठिकाणीं वडिलांचा अंशतः मत-विरोध अनुवंशिकच होता. यास्तव आपला मुलगाच आपले हेतु स्वाभिमानानें पुरे करील, असें त्यांस वाटत राहाणें व त्या मुलाच्या आगमनाची त्यांनीं सतत मार्गप्रतिक्षा करणें, हें त्यांच्या महत्त्वाकांक्षेला धरूनच होतें.

याप्रमाणें तात्यांचे डोक्यांत सन १८९८।९९ सालचे सुमारास कोणत्या विचारांचें काहूर माजलें होतें, त्याचें येथवर थोडक्यांत दिग्दर्शन केलें आहे. त्यांत एकच गोष्ट सांगावयाची राहिली ती ही कीं, ह्या एषणांच्या तुफानांत सांपडलेल्या ह्या नौकेच्या शीडदोऱ्या वगैरे सामान असावें तसें मजबूत नव्हतें. तात्यांची शरीरप्रकृति प्रारब्धयोगानें असावी तशी निकोप नव्हती. त्यामुळें सर्व एषणांचा ताण त्यांच्या प्राणेषणेवर पडे. तें त्यांस सहन करणें फारच कठीण जाई. इतर एषणांप्रमाणें त्यांची प्राणेषणा अथवा जीवनेच्छाहि प्रबल होती.

लोकेषणा, वित्तेषणा, दारेषणा, पुत्रेषणा आणि प्राणेषणा ह्या पांचच एषणा प्रसिद्ध आहेत. यांपैकीं प्राणेषणा ही वैद्यक शास्त्रानेंच फक्त मानली आहे, असें दिसतें. या सर्व एषणांचा समावेश स्थूल मानानें काम आणि अर्थ या दोनच पुरुषार्थांत करावा लागेल. पण या दोन पुरुषार्थांशिवाय व्यावहारिकांस जो तिसरा पुरुषार्थ धर्म हा सांगितला आहे, त्याप्रमाणें धर्मेषणा हीसुद्धां एक एषणाच मानली पाहिजे. निदान तात्यांचे ठिकाणीं तीच एषणा विशेष तारक होती. तात्या हे

प्रामुख्यानें रजोगुणी होते, हें तर उघडच आहे. पण त्यांच्या ठिकाणीं सत्त्वांशहि बराच होता यांत शंका नाहीं. आणि रजोगुण हा जरी त्यांच्या ठिकाणीं कारक असला तरी सत्त्वगुण हाच तारक होता.

धर्माचें बंधन नसेल तर अशा अत्यंत प्रबळ एषणांची त्यांच्या तृप्तीसाठीं प्रवृत्ति अनीतिकडेहि झुकावयाची पण त्या बाबतींत तसें घडलें नाहीं. धर्म या पुरुषार्थाचें इतर पुरुषार्थांवर इतकें परिणामकारक वर्चस्व होतें कीं, त्यामुळें त्यांच्या सर्व एषणा त्यांच्या कर्मयोगाला दूषणावह न ठरतां भूषणावहच ठरल्या. त्यांतहि त्यांच्या ह्या धर्म पुरुषार्थाच्या नौकेला कर्णधार अलौकिक लाभल्यामुळें त्यांचा आयुष्याचा ह्यापुढील काल पारमार्थिक दृष्टीनेंहि महत्त्वाचा गेला.

**यतो धर्मस्ततो जयः ।**

[ जिकडे धर्म तिकडे जय ]





# प्रकरण १७ वें.

## श्रीसद्गुरु प्राप्तीची आकांक्षा.

उपासनेचा मोठा आश्रयो । उपासनेविण निराश्रयो ।
उदंड केलें तरी तो जयो । प्राप्त नाहीं ॥ २९ ॥
समर्थाची नाहीं पाठी । तयास भलताच कुटी ।
या कारणें उठाउठी । भजन करावें ॥ ३० ॥

दासबोध. १६।१०

वरील दासबोधांतील वचनें परमार्थलाभालाच अनुलक्षून आहेत. सद्गुरुप्राप्तीसंबंधीं जीं जीं वचनें आहेत, तीं सारीं परमार्थलाभालाच धरून आहेत.

आतां मनास जें अप्राप्त । तें कैसें होईल प्राप्त ।
ऐसें म्हणाल तरी कृत्य । सद्गुरुविण नाहीं ॥

यथें सुद्धां अप्राप्त म्हणजे मोक्षच होय.

तात्पर्य—

असो जयासि मोक्ष व्हावा । तेणें सद्गुरु करावा ।
सद्गुरुविण मोक्ष पावावा । हें कल्पांतीं न घडे ॥ दा.बो.५।१।४८

इतकाच सिद्धांत आहे. अध्यात्म रामायणांत प्रभु रामचंद्र म्हणतात—

**आदौ स्ववर्णाश्रमवर्णिताः क्रियाः कृत्वा समासादितशुद्धमानसः।**
**समाप्य तत्पूर्वमुपात्तसाधनः समाश्रयेत्सद्गुरुमात्मलब्धये॥**

रामगीता.

[ प्रथमतः मनुष्यानें स्ववर्णाश्रमानुसार नित्यनैमित्तिक कर्में करावीं. त्यायोगें अंतःकरण शुद्ध होईल. पुढें त्या अंतःकरण शुद्धी-मुळें शमदमादि साधनें प्राप्त झालीं असतां, कर्माचरण सोडून द्यावें, व आत्मज्ञानासाठीं सद्गुरूंचा आश्रय करावा. ]

यावरून प्रपंचपूर्ति आणि सद्गुरुप्राप्ति यांचा वस्तुतः कांहींच संबंध नाहीं, हें उघड होतें. परंतु व्यवहारांत प्रापंचिक आपल्या प्रपंचपूर्तिकरतां साधूंस शरण जातात व तेहि अशा प्रापंचिकांना अभय देतात, असें आढळतें.

मागील प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें सन १८९८–९९ सालीं विष्णु-तात्या अत्यंत विचारक्रान्त होते. आणि त्यावेळीं त्यांस मार्गदर्शी-कांची फारच उणीव भासत होती. त्यांचे सल्लागार व केवळ उजवे हात दत्तोपंत सांडू यांच्याशीं त्यांचा तीव्र मतभेद होऊं पहात होता. या सुमाराला त्यांना सत्समागम घडेल असें सहा वर्षांपूर्वीं सुप्रसिद्ध ज्योतिषी बाबाजीराव पटवर्धन महाडकर यांनीं सांगितलें होतें. जनार्दन महादेव ऊर्फ भाऊसाहेब गुर्जर यांच्याबद्दल तात्यांना इतका आदर होता कीं, त्यांच्या भावनाप्रधान स्वभावाला भाऊसाहेब गुर्जर हेच आपले पारमार्थिक गुरु होणार, असें वाटूं लागलें होतें. बुडत्याला काडीचा आधार अशी हळुवार भावनाप्रधान मनाची पुष्कळ वेळां स्थिति होते. तारीख १३ आगष्ट सन १८९८ चे एका पत्रांत तात्या लिहितातः—

“ मित्र भाऊसाहेब ( गुर्जर ) यांची आरंभीं व्यापारी नात्यानें ओळख झाली. संसारी म्हणून पारपुंडांत रहाण्यास आल्यापासून ऐक्य झालें आहे व लवकरच ते परमार्थांतहि गुरुपद मिळविणार असें वाटत आहे.... मित्र भाऊसाहेब यांस आरंभापासूनच मी गुरु नात्यानें ओळखीत आहें. ” याच पत्रकांत ते पुढें लिहितातः—

“ गेल्या पंधरा दिवसांत मनावर असे कांहीं दुर्धर, दुःसह व भयंकर विचारतरंग येत आहेत कीं रात्रंदिवस तिकडे लक्ष्य असतें ! व तें असलें म्हणजे मनाला अगदीं चैन नसतें. हल्लींच चोहोंकडे जे डोहाळे होताहेत हे कशाचे ? आरंभिल्या कामास त्यापासून न्यूनाधिक काय होणार ? संरक्षणाचे काय उपाय करावे ? मित्रमंडळीरूप किल्ल्याच्या प्रत्येक बुरुजाला प्रारब्धरूप निरनिराळ्या जळवा ( सुरुंग ) कशा लागल्या आहेत, वगैरे तरंग येतात ! आपण कोण ? एकटा आलों व एकटा जाणार ! एकट्यानें करून काय होणार ! इत्यादि सुविचार व वरील तरंग यांची निकराची लढाई हल्लीं चालू आहे व मनोरूप समरभूमीवर सुविचाराचा जय होणार असें खात्रीनें वाटत आहे ! त्यांत आमचे गुरुजी प्रत्यक्षच सर्व नाटक करून दाखवित आहेत ! मग अनुभव कां न ठसावा ?... मित्र भाऊसाहेब हे पारपुंडच्या ग्रहमालेचे सूर्य आहेत. इ० ”

याप्रमाणें ज्या भाऊसाहेब गुर्जरांबद्दल तात्यांची अत्यंत आदरबुद्धि होती, ते भाऊसाहेब गुर्जर व त्यांचे स्नेही पुण्याचे बाबासाहेब गोडबोले यांचा ओढा दत्तोपंत सांडूकडेच अधिक असे. यामुळें तोहि आधार तुटल्याप्रमाणेंच झाला होता. शिवाय भाऊसाहेब गुर्जरांचे व्यवहार आणि व्याप कांहीं थोडे नव्हते. त्यामुळें तात्यांना त्यांच्या सल्लामसलतीचा लाभ पुढें पुढें कितपत मिळत राहिला असेल, याची शंकाच वाटते.

सन १८९८ सालीं सखारामशास्त्री प्लेगनें वारले. तेव्हां तात्यांचा एक मोठाच आधार तुटला. घरीं वडिलांजवळ घडोघडीं मोकळेपणानें बोलण्याचा त्यांचा कधींच प्रघात नव्हता. आणि बंधू तर लहान व अननुभवी. तेव्हां विचारविनिमय कोणाशीं करावा ? ही त्यांस मोठीच अडचण झाली होती. अशा वेळीं ते या लेखकासारख्या विशेष परिचितहि नाहीं, अशा एका अननुभवी तरुण ग्राहकाशींहि पत्रद्वारें विचारविनियम करीत. पण त्यापासून त्यांस कितीसा लाभ होणार !

तारीख ३० सप्टेंबर सन १८९९चे मला आलेल्या एका पत्रांत ते लिहितात:—"आरंभीं आपल्याप्रमाणेंच माझ्या डोक्यांत विचार येत होते. व त्यांपैकीं बहुतेक हल्लींच्या रूपानें आपल्यासारख्या होतकरू मनुष्यांना दाखवितां येत आहेत. यापुढील विचार अमलांत आणण्याला आपल्यासारख्या उत्साही पुरुषांची मदत पाहिजे. त्यावांचून तें काम होणें नाहीं. स्थान, भांडीं, इमारत याकरितां आपणांला निराळें भांडवल पाहाणें नको व खपाकरितां गिऱ्हाइकही मिळवायला नको आणि हिशोब कसा ठेवावा याची मोडणी शिकावयाला नको. अशी तजवीज थोड्या अंशानें तरी येथें आहे. पुढील भाग देशाभिमानी पुरुषांकडे आहे."

यानंतर त्यांचे कॅटलॉगाची नवी आवृत्ति काढण्यापूर्वी त्यांत काय सुधारणा करावी, वगैरे बाबतींत त्यांचा व माझा सतत पत्रव्यवहार सुरू राही. पण मी त्यावेळीं वसईस वकिलीचा अभ्यास करणारा एक सामान्य विद्यार्थी होतों. मी त्यांना वसईहून पत्रद्वारें काय सुचविणार व त्याचा त्यानां कितपत उपयोग होणार ?

पण वसईस आमच्या मामांकडे त्यांची एजन्सी असे. माझे आजोबा ( मातामह ) कांहीं दिवस पनबेलीस राहात असत. ते

पूर्वीच्या पिढींतील एक मुत्सद्दी होते. त्यांची व कृष्णशास्त्री यांची एकत्र बैठक होत असे. त्यांच्या तोंडून मला पुराणिकांचे कारखान्याची हकीकत समजे. तसेंच पुराणिकांचे कारखान्यासंबंधीं ठिकठिकाणचे वैद्य व ग्राहक यांचे आरंभीं कांहीं आक्षेप असत. कोणत्याहि कर्तृत्ववान् व्यक्तीबद्दल किंवा संस्थेबद्दल आरंभीं असे आक्षेप घेणारे अनेक निघतात. हे आक्षेप माझे कानीं येत. शिवाय सांडू विरुद्ध हर्डीकर या वाद्यांतील मुंबईच्या ठाकूरद्वारच्या आर. हर्डीकर यांचे दुकानांत मी मुंबईस असतां माझी हंमेश बैठक असे. त्यावेळीं पुष्कळ वेळां चर्चेचा विषय पुराणिकांचा कारखाना हाच असे. याप्रमाणें दोन्ही बाजू मला थोडथोड्या कळत.त्यावरून मी स्वतांचे कळकळीनें व हौशीनें तात्यांना पत्रें लिहीत असें. याप्रमाणें मजसारख्या त्रयस्थ ग्राहकांशींहि तात्यांचा विचारविनिमय होत राही.

मला ह्यावरून एवढेंच दाखवावयाचें आहे कीं, ते सर्वांच्या सूचना ऐकून घेण्यास तयार होते, 'कारखान्यांतील औषधि क्रियेबद्दल, पत्रव्यवहाराबद्दल किंवा कोणत्याहि व्यवस्थेबद्दल, कोणाचे आक्षेप असतील तर त्यांस येथें घेऊन यावें व आक्षेपनिरसन करून घ्यावे, त्यांचा जाण्यायेण्याचा खर्च मी देईन,' असेंहि त्यांनीं मला कळविलें होतें. शिवाय येथें उद्योगशाळा आरंभिली आहे. कोणीहि होतकरू पुरुषानें येथें येऊन आपलें कर्तृत्व करून दाखवावें, असेंहि त्यांचें सर्वांस सांगणें असे. याप्रमाणें, कर्तृत्ववान् पुरुषांची, सहकारी मित्रांची व योग्य सल्लागार मार्गदर्शकाची त्यांना अत्यंत उणीव भासूं लागली होती. कोंडलेला जीव शुद्ध हवेवांचून, गुदमरावा, त्याप्रमाणें विशेषेंकरून कोणा अधिकारी मार्गदर्शकावांचून, त्यांचा जीव गोंधळांत पडला होता !

कर्तृत्ववान् पुरुषाला मार्गदर्शकाची भासत असलेली ही गरज ईश्वर कशी भागवितो, हा विचार मोठा मनोरंजक व चिंतनीय होईल. अत्यंत महत्त्वाकांक्षी कार्तवीर्याला श्रीदत्त गुरु झाले. ध्रुवपद मिळविणाऱ्या ध्रुवाला नारद भेटले. क्षात्रविद्या शिकणाऱ्या एकलव्यानें तर मातीचाच द्रोणाचार्य केला. स्वराज्य संस्थापक शिवबांच्या अंगांत देवीचा संचार होई. स्वराज्याचा लढा लढणाऱ्या बाजीरावांचे ब्रह्मेंद्रस्वामी होते. लोकसंग्रहकारी श्रीसमर्थ रामदासांना हनुमान भेटले. श्रीरामकृष्णांना कालीस विचारावें लागे. असे हे मार्गदर्शकांचे वेगवेगळे प्रकार दिसतात. कांहीं असो. कोणी तरी आपल्याला विचारण्यास असावें, कोणाचा तरी आधार असावा, असें कार्यकर्त्या माणसास वाटत असतें. घरांतील वृद्ध माणसांच्या छत्राचें महत्त्व ज्याप्रमाणें घरांतील कर्त्या स्त्रीपुरुषांस वाटतें, तसांच हा प्रकार आहे. अर्थात् कौटुंबिक जबाबदारीपेक्षां ही जबाबदारी जितकी मोठी असेल, त्या मानानें मार्गदर्शकाची गरजहि जास्त जाणवेल हें उघड आहे. वर जीं उदाहरणें दिलीं आहेत, तीं केवळ निवृत्तिप्रधान मुमुक्षेची नसून प्रवृत्तिलक्षण धर्मांतीलहि आहेत.

मी ह्या प्रकरणाला सद्गुरुप्राप्ति असें नांव दिलें आहे. आणि लहान मोठ्या कोणत्याहि प्रपंचाच्या अथवा उद्योगाच्या सिद्धीशीं सद्गुरुप्राप्तीचा कांहींच संबंध दिसत नाहीं, असेंहि मीं म्हटलें आहे. पण समर्थांच्या कर्मयोगांत

**उदंड मुलें नानापरी। वडिलांचें मन अवघ्यांवरी।**
**तैसी अवघ्यांची चिंता करी। माहां पुरुष॥**

असें म्हटलें आहे, आणि त्याप्रमाणें जगाचा अनुभवहि आहे. दारिद्र्य, रोग, भूतबाधा, निपुत्रिकत्व, हानि, इत्यादि प्रापंचिक आपत्तींपासून रक्षण व्हावें, म्हणून बहुत लोक संतांस शरण जातात.